# प्रश्न उपनिषद




जन्मशताब्दी

२००४ - २००५ स्मृती सौरभ ४०



प्रा. दत्तात्रय. ना. दुभाषी

**पहिली आवृत्ती :** महाशिवरात्री - फेब्रुवारी २००६

**मुखपृष्ठ :** वैभव शिर्के

**अक्षर जुळणी :**
ओंकार कॉम्प्युटर्स,
बी-३०, अपर्णा सोसायटी, पं. दीनदयाळ मार्ग,
डोंबिवली(पश्चिम) फोन - २४८ ७१५७

**मुद्रित शोधन :** ज्ञानेश्वर भालेकर

**मुद्रण :**
देविका आर्ट प्रिंटर्स,
ए-२, नवसहयोग को.ऑप. सोसायटी,
३६०, सेनापती बापट मार्ग, माहीम,
मुंबई - ४०० ०१६
टेलिफोन - २४३७ ८८८०

**मूल्य : रु. ३०/-**

**प्रकाशक :**




सिध्दगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

# प्रस्तावना

'गीता धर्मा'चे व्यापक तत्त्वरूप विशद करून सांगणारा 'ज्ञानेश्वरी' हा श्रेष्ठ ग्रंथ आहे. विश्वात्मक देवाला संतुष्ट करण्यासाठी विश्वात्मक झालेल्या ज्ञानदेवासारख्या महापुरुषाने विश्वकरुणेने केलेले हे धर्मकीर्तन आहे... त्यातील प्रतिपादन समस्त मानवजातीच्या कल्याणासाठी असल्याने गेली सात-आठ शतके या ग्रंथाचा अभ्यास केला जात आहे व यापुढील काळातही तो तितक्याच निष्ठेने सदैव होत राहील यात तिळमात्र अतिशयोक्ती नाही.

**आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकी इये ।**
**दृष्टादृष्टविजये । होआवे जी ।।**

हे ज्ञानदेवांनी पसायदानातच मागणे मागून त्यावर सद्गुरू निवृत्तिनाथांचा अनुकूल आशीर्वाद घेतला आहे. 'दैनंदिन जीवनात ज्ञानेश्वरी' या प्रा. द. ना. दुभाषी यांच्या अभ्यासपूर्ण लेखनात ज्ञानदेवांचे हे मुख्य सूत्र कौशल्याने पाळले आहे. प्रत्येक अध्यायामध्ये कोणत्या ओव्यांना प्राधान्य द्यायचे? त्यातील तत्त्वज्ञान कसे समजावून घ्यायचे? ज्ञानदेवांना या ओव्यांमधून नेमके कोणते प्रतिपादन करायचे आहे? याचा सुंदर समन्वय प्रा. दुभाषी यांनी साधला आहे.

सामान्य माणसाचे ज्ञानेश्वरीद्वारा प्रबोधन ही दुभाषी यांची भूमिका आहे. निवडलेल्या ओव्यांचे ते ओघवत्या वाणीने प्रतिपादन करतात. संवेदनाक्षम मनाने रसग्रहण करतात आणि समरस होऊन चिंतन-मनन करीत करीत उद्बोधक विचारवैभव सांगत जातात. हा केवळ ज्ञानेश्वरीतील ओव्यांचा अनुवाद नाही. मूळ पदांची व प्रमेयांची साथसंगत न सोडता हे केलेलं हृदयंगम विवेचन आहे. ज्ञानदेवच सांगतात -

**म्हणोनि मने काने वाचा । जो सेवकु होईल इयेचा ।**
**तो स्वानंद साम्राज्यीचा । चक्रवर्ती करी ।।**

ही ज्ञानेश्वरीची खरी 'फलश्रुती' आहे. ती सामान्यातील सामान्य वाचकाच्या पदरी सहजासहजी पडावी यासाठी केलेला हा एक प्रांजळ तसाच यशस्वी प्रयत्न आहे.

'ईश्वरनिष्ठ' होऊन जो कोणी ज्ञानेश्वरीच्या आशय सागरात शिरू पाहील त्या प्रत्येकाला निर्मळ, निष्कलंक अशा चैतन्यतत्त्वाचे दर्शन निश्चित होईल. स्वधर्म सूर्याचा उदय त्याच्या अंतर्यामी होऊन, सत्त्वगुणांच्या तेजस्वी प्रकाशाने

त्याचे समग्र जीवन दीप्तिमान होऊन जाईल हे सांगण्या-शिकविण्याचा प्रा. दुभाषी यांचा उत्तम प्रयत्न आहे. मनःपरिवर्तन होऊन लौकिक आणि आध्यात्मिक दोन्ही पातळ्यांवर यशस्वी व्हायचे आहे. त्यासाठी गीता - ज्ञानेश्वरीचाच अभ्यास आवश्यक आहे. गीता-ज्ञानेश्वरीतील तत्त्वज्ञान हे नित्यनूतन आहे. ज्ञानदेवांच्या अंतरीचे गूज आपल्याला कळले पाहिजे. या तीव्र ओढीने जे कोणी हा ग्रंथ वाचतील व तसे जीवन जगण्याचा प्रयत्न करतील त्यांच्या जीवनात त्यांना धन्यता, कृतार्थता यांचा लाभ होईल, हे प्रा. दुभाषी यांना पटवून द्यायचे आहे. सामान्य माणसाच्या जीवनाला पोषक, उद्‌बोधक असे मार्गदर्शन या ग्रंथामधून पानोपानी झाले आहे.

प्रा. द. ना. दुभाषी हे विद्यार्थिदशेपासून प्रभावी वक्ते, अभ्यासू समीक्षक, नाट्यप्रेमी रसिक आणि वृत्तपत्रकार म्हणून नावाजलेले होते. प्राध्यापक म्हणून शिक्षण क्षेत्रात आल्यानंतर त्यांच्या अध्ययन अध्यापनाला आणखी व्यापकता आणि सखोलता प्राप्त झाली. उपनिषदे, गीता, ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा यासारख्या शाश्वत मूल्ये सांगणाऱ्या ग्रंथांशी त्यांनी अंतरंग नाते जोडले. प्रा. दुभाषी यांचे चिंतनविश्व या ग्रंथांनी व्यापून गेले आहे. त्यांनी जो विचार-सिद्धांताचा शोध घेतला तो जिवंत, रसरशीत शब्दांत साहित्यरूपाने या ग्रंथात साकार झाला आहे!

'मी विश्वेसी विश्वात्मा' किंवा 'सर्व भूतांसी अभिन्नू' हे भगवंताचे सांगणे सर्व अध्यात्माचे मूळ सत्य स्वरूप आहे. ते पटण्यासाठी व अनुभवण्यासाठी अशा ग्रंथांचा, विवेचनाचा निश्चित उपयोग होतो. प्रा. दुभाषी यांच्या या ग्रंथाचे मी हार्दिक स्वागत करतो. त्यांना धन्यवाद देतो!

**– स्वामी प्रज्ञानंद (तथा प्रा. म. अ. कुलकर्णी)**
कोल्हापूर

# मनोगत

उपनिषद मालिकेतील 'प्रश्नोपनिषद्' हे चवथे उपनिषद वाचकांसमोर सादर करताना आनंद होतो आहे. या उपनिषदाचे स्वरुप व माहात्म्य स्वतंत्र प्रकरणात केले आहेच. त्यामुळे येथे त्याची पुनरुक्ति करत नाही.

तसे हे छोटेखानी उपनिषद आहे. भगवान पिप्पलाद ऋषींकडे आत्मज्ञानाची उत्कट जिज्ञासा असलेले सहा शिष्य येतात. ते ऋषींना प्रत्येकी एक असे, एकूण सहा प्रश्न विचारतात. आचार्य या सर्व प्रश्नांची उत्तरे देतात. हा गुरु-शिष्य संवाद या उपनिषदाचा मुख्य गाभा आहे व प्रतिपाद्य प्रमुख विषय 'प्राणविद्या' हा आहे. जीवसृष्टीची उत्पत्ती, ॐकार साधना, सोळा कला असे इतर विषय अनुषंगिक आहेत.

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामींच्या प्रेरणेने व कृपाशिर्वादाने हे माझे अकरावे पुस्तक प्रसिद्ध होत आहे. ही ग्रंथसंपदा म्हणजे प. पू. स्वामींनी आरंभिलेल्या ज्ञानयज्ञात अर्पण केलेल्या समीधाच आहेत. ज्ञानानेच मनुष्याच्या जीवनात सुख, समाधान, शांती प्राप्त होते. उपनिषदांचे मौलिक तत्त्वज्ञान अत्यंत सोप्या शब्दांतून सामान्यातल्या सामान्य माणसांपर्यंत पोहोचावे ही स्वामींची इच्छा आहे. मनुष्याचा जन्म सफल व कृतार्थ होण्यासाठी आत्मज्ञानाची आवश्यकता आहे असा सर्व उपनिषदांचा सारभूत संदेश आहे.

अशा या उपनिषदातील शुद्ध, पवित्र विचारांनी आपले सर्वांचे जीवन परिपूर्णतेच्या दिशेने समृद्ध व्हावे ही भगवंतचरणी प्रार्थना.

या ग्रंथनिर्मितीसाठी श्रद्धेने परिश्रम घेतलेल्या सर्व घटकांचे मनःपूर्वक आभार.

**– प्रा. द. ना. दुभाषी**

'हरि-कृपा'
९०५/१३अ, सरदार पार्क,
देवकर पाणंद, कोल्हापूर ४१६ ०१२
फोन : ५६१२३८१
९८२२५१८२४८

## ।। ग्रंथासाठी अर्थदान ।।

**शतेषु जायते शूरः सहस्त्रेषु च पण्डितः ।**
**वक्ता दशसहस्त्रेषु दाता भवति वा ना वा ।।**

वरील सुभाषितात म्हटल्याप्रमाणे, दाता भेटणे ही खरोखरच फार दुर्मिळ बाब आहे. एका सत्पुरुषाने दात्याला साक्षात् देवाची उपमा दिली आहे. ते म्हणतात, "देव दाता यात अंतर ते कोणते?"

परंतु जगद्गुरु काडसिध्देश्वर महाराजांच्या आशीर्वादातून व प.पू. अदृश्य काडसिध्देश्वर महाराजांच्या आचरणरुपी प्रेरणेतून एखादा दाता नावारुपाला येणं यात विशेष ते काय! पाठीवर कृपा करणारा हात असेल तर पुढे जाण्यात वेगळीच मजा असते.

ब्रम्हलीन जगद्गुरु श्री काडसिध्देश्वर महाराज यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने प.पू. अदृश्य स्वामीजींनी १०० पुस्तके प्रकाशित करण्याचा शुभ संकल्प सोडला आहे. त्यांच्या या यज्ञात गुरुभक्त **सायली एन. पाटील** यांनी या ग्रंथासाठी अर्थदान करून समीधा वाहण्याचे मौलिक कार्य केले आहे. **'प्रश्नउपनिषद'** हे **४०वे** ग्रंथपुष्प त्यांच्यातर्फे गुरुचरणी अर्पण!

सायली एन. पाटील ह्या आपल्या सांप्रदयाचे सदस्य असून तन,मन, धन गुरुसेवेत लावून ते आपले कर्तव्य चोख बजावत आहेत. समर्थ गुरुमाऊलीवर त्यांची अपार श्रध्दा आहे.

अर्थदानाच्या रुपाने केलेली त्यांची ही सेवा अनेकांना प्रेरणादायी ठरो. त्यांना व त्यांच्या कुटुंबियाना भरपूर आयूआरोग्य, धनसंपदा, शांती समाधान लाभो हीच गुरुंचरणी प्रार्थना!

प्रकाशक
सिध्दगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

## अनुक्रमणिका

# उपनिषदांचे स्वरूप व महत्त्व

विश्वधर्म व प्रेमाचा संदेश देणारे उच्चतम तत्त्वज्ञान असणारी उपनिषदे संख्येने बरीच (२३९) असली तरी महत्त्वाची उपनिषदे म्हणून एकूण अकरा उपनिषदांचा उल्लेख केला जातो. ती ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्डक, माण्डूक्य, तैत्तिरीय, छान्दोग्य, ऐतरेय, बृहादारण्यक व श्वेताश्वतर अशी आहेत. शंकराचार्यांच्या भाष्यातून याच महत्त्वाच्या उपनिषदातील वचने उद्धृत केली आहेत. उपनिषद या शब्दाची फोड उप + नि + सद अशी करता येते. सद म्हणजे बसणे, उप आणि नि हे उपसर्ग लावल्याने, 'गुरूच्या फार जवळ (उप) आणि निष्ठापूर्वक (नि) बसणे' असा अर्थ होतो. वेदातील पहिल्या दोन भागांस कर्मकांड व शेवटच्या दोन भागांस ज्ञानकांड असे म्हटले जाते. या उपनिषदातील काही भाग श्लोकबद्ध आहे व बराचसा भाग गद्यात्मक आहे. उपनिषदामध्ये बराचसा भाग संवाद पद्धतीने सांगण्यात आला आहे. यम आणि नचिकेत (क), आरुणी आणि त्याचा पुत्र श्वेतकेतु (छा), इंद्र आणि प्रजापति (छा), याज्ञवल्क्य आणि त्याची पत्नी मैत्रेयी (बृ) इत्यादी संवाद प्रसिद्ध आहेत. बुद्धीने शोध घेत घेत काही सत्य प्रतिपादन करावे या वृत्तीतून उपनिषदांचा जन्म झाला. एका व्यक्तीने सलगपणे निर्माण केलेले वाङ्मय असे उपनिषदांचे स्वरूप नाही. भिन्नभिन्न काळात निरनिराळ्या ऋषींना स्फुरलेले विचार आणि त्यांना आलेल्या अनुभूती यांचे उपनिषदात कथन केलेले आहे. प्रत्येक उपनिषदात व्यक्तीला अमृततत्त्वाची प्राप्ती कशी होईल याचीच चर्चा प्रामुख्याने केली आहे. आकर्षक असणाऱ्या व मोह पाडणाऱ्या नाशवंत प्रेय गोष्टींनी मनुष्याला अखंड सुख प्राप्त होत नाही. पण आत्मज्ञानाचे श्रेय प्राप्त झाल्यास त्याला अमृततत्त्व किंवा अखंड आत्मसुख प्राप्त होते, याबद्दल सर्व उपनिषदांत एकवाक्यता आहे. व्यक्तीच्या आंतर्यामी असलेला आत्मा हाच विश्वाचे आधारभूत तत्त्व जे ब्रह्म ते होय याबद्दलही सर्व उपनिषदांत एकवाक्यता दिसते.

वैदिक धर्म आणि वैदिक तत्त्वज्ञान या दोहोंचे उपनिषदे हे आधारभूत ग्रंथ आहेत. खरा धर्म म्हणजे आत्मज्ञान हे तत्त्व या उपनिषदांनी प्रभावीपणे मांडले आहे.

वेदकाळ सोडून उपनिषदकाळाकडे आपण जेव्हा पाहतो त्या वेळी एक गोष्ट प्रामुख्याने समजते ती ईश्वरजिज्ञासेपेक्षा आत्मजिज्ञासेकडे तत्त्वज्ञानी

आचार्यांचे मन अधिक गुंतले होते. वैदिक संहिता ग्रंथामध्ये सृष्टीतील निरनिराळ्या शक्ती या देवता आहेत असे मानून त्यांचे स्तवन करणे हे प्रमुख उद्दिष्ट होते, पण या उपनिषद काळात ईश्वरतत्त्वाचा असा वरवरच्या बाह्यदृष्टीने विचार न करता या सृष्टीच्या मुळाशी आणि त्या सृष्टीस आधारभूत असे कोणते मूलतत्त्व आहे याचा विचार शास्त्रीय दृष्टीने केला गेला. म्हणूनच वैदिक साहित्यातील प्रार्थना, ईश्वराविषयीची अवास्तव भीती, बहुईश्वरवाद, परमेश्वराचे स्तुतिपाठ अशा स्वरूपाचे वर्णन उपनिषदांतून येत नाही. उलट आत्मा, ब्रह्म, परब्रह्म, आपरब्रह्म, आत्मा आणि ब्रह्म यांचे ऐक्य, कर्मसिद्धांत व मृत्यूनंतरची स्थिती, एकेश्वरवाद अशा प्रकारचे आत्मज्ञानाचे विषय उपनिषदांमध्ये विशद केले आहेत. म्हणून उपनिषदे ही आत्मज्ञान सांगणारी, बहिर्मुखता सोडून अंतर्मुखतेला स्थान देणारी व बुद्धिवादी तात्त्विक विचारसरणी अवलंबणारी श्रेष्ठ ग्रंथसंपदा ठरली. म्हणूनच 'ज्याचे ज्ञान झाले असता बाकी सर्वांचे ज्ञान होते असे तत्त्व कोणते?' असा मुण्डक उपनिषदातील प्रश्न अन्य उपनिषदातही पुनःपुन्हा विचारलेला दिसून येतो. उपनिषदकाळातील ऋषींना ईश्वरप्राप्तीपेक्षा आत्मज्ञानाची ओढ अधिक होती.

अशा आत्मज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव कसा घेता येईल व त्यासाठी कोणत्या प्रकारच्या नीतीची, चारित्र्याची गरज आहे, याचा शोध त्यांनी घेतला. कठोपनिषदामध्ये नचिकेताने यमाला या आत्मज्ञानासंबंधी जे प्रश्न विचारले ते प्रश्न सर्व उपनिषदांमध्ये पुनःपुन्हा आले आहेत. 'मनुष्य मृत्यूनंतर कोठे जातो?' 'आत्मा म्हणजे काय?', 'जगामध्ये सत्य गोष्ट कोणती? बुद्धीच्या साहाय्याने आत्म्याचे स्वरूपज्ञान कितपत शक्य आहे?' अशा प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे तत्त्वज्ञान व अनुभूतीद्वारे करणे हे उपनिषदांचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. बृहदारण्यक उपनिषदात जनक राजाने याज्ञवल्क्य ऋषीस विचारले की, हा आत्मा कोणाकडून प्रकाशला जातो? तो आहे असे ज्ञान कोणाला होणार? त्याच्या अस्तित्वाचा पुरावा कोठून आणावयाचा? अशा प्रश्नांना याज्ञवल्क्याने उत्तर दिले की, जेव्हा सूर्य, चंद्र, अग्नी इत्यादी प्रकाशक अस्तास जातात तेव्हा हा आत्मा प्रकाशतच असतो, कारण तो स्वयंज्योतीही आहे. त्याचे अस्तित्व स्वसंवेद्य आहे. स्वप्न व जागृत अवस्थेत हा अनेक विषयांचा अनुभव घेत असला तरी तो स्वप्न व जागृती या दोहोहूनही निराळा आहे. जेव्हा स्वप्नात विषय नसतात तेव्हा असंग आत्मा नसतो असे नाही. सुशुप्ती अवस्थेत तो आनंदाचा भोग घेतो. जागृती, स्वप्न व सुशुप्ती (गाढ झोप) या तिन्ही अवस्थांतील अनुभवांना तो साक्षी असतो. असा हा आत्मा हीच सर्वांत प्रियतम अशी वस्तू आहे, असे याज्ञवल्क्य आपली पत्नी मैत्रेयी हिला सांगतात. मनुष्याला



जी कोणतीही गोष्ट प्रिय असते ती त्या त्या गोष्टीकरिता नसून, स्वतःकरिता म्हणजे आत्म्याकरिता प्रिय असते हे त्रिकालाबाधित सत्य त्यांनी आपल्या पत्नीला सांगितले. ते महान सत्य असे 'न वा अरे, सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवित, आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ।' पती प्रिय असतो तो पतीच्या काही कामनेसाठी नव्हे तर आपल्या स्वतःसाठी, पुत्र प्रिय असतो तर पुत्रासाठी नव्हे तर आपल्यासाठी, म्हणून साऱ्या आनंदाचा व सुखाचा जिवंत झरा हा आत्माच आहे. म्हणून अशा आत्म्याचे चिंतन, मनन, निधिध्यासन करावे असे उपनिषदांचे म्हणणे आहे. कारण अशा आत्म्याला जाणून घेतल्यानंतर जाणावयाचे काही शिल्लक राहत नाही. कारण आत्मा हे ब्रह्माचेच स्वरूप आहे.

सर्व उपनिषदांत ब्रह्माच्या या स्वरूपाविषयी खूप सांगितले आहे. ब्रह्म हे आनंदरूप म्हणून सांगितले आहे. छान्दोग्य उपनिषदात त्याचे स्वरूप 'सत्' असे केले आहे. आरुणी आपला पुत्र श्वेतकेतु याला म्हणतो, 'पुत्रा प्रथमतः हे केवळ सत् होते त्या सत्मध्ये जाणिवेचे असे स्फुरण झाले की आपण बहू व्हावे म्हणून ही नामरूपाची सृष्टी निर्माण झाली. तेच सत् तत्त्व सर्वत्र भरून राहिले आहे. ते आत्मस्वरूप आहे व तो आत्मा तूच आहेस. 'या उपनिषदात, 'तत्वमसि' (ते तू आहेस) हे वाक्य श्वेतकेतुला अनेकवेळा उच्चारिले आहे. अद्वैत वेन्दात मतातील चार महावाक्यांपैकी हे एक आहे. सर्व उपनिषदांमध्ये ब्रह्माची दोन प्रकारची वर्णने येतात. ब्रह्म अविकारी, निर्गुण, भेदरहित आहे. त्याचप्रमाणे ते विकार पावून जग निर्माण करणारे, बहू होणारे आणि शुभ गुणांनी युक्त आहे, असेही म्हटले आहे.

ब्रह्म निर्गुण आहे असा विचार उपनिषदांतून जागोजागी व्यक्त केला आहे असे असूनसुद्धा त्याच्या विकारीत्वाचेसुद्धा वर्णन आहे. सगुण-निर्गुण वादात श्री शंकराचार्यांनी अशी बाजू घेतली आहे की, निर्गुण ब्रह्म हे खरे अंतिम तत्त्व अथवा परब्रह्म होय. त्याचे ज्ञान ही पराविद्या होय. अविद्येमुळे अथवा मायेमुळे त्याच्यावर गुणांचा आरोप होतो. हे सगुण ब्रह्म उपासनेला उपयोगी असल्याने उपनिषदांत त्याची वर्णने येतात, अशी एक बाजू सांगितली जाते. अशा दोन्ही प्रकारांची वर्णने उपनिषदांत असली तरी जग हे ब्रह्माधारित आहे. ब्रह्माहून स्वतंत्र असे अस्तित्व नाही या मुद्यावर मात्र उपनिषदांत मतभिन्नता नाही. ब्रह्म जगात ओतप्रोत आहे, ब्रह्माच्या आधारानेच जग आहे, याबद्दल सर्व उपनिषदांत मात्र एकवाक्यता आहे. 'सर्वं खलु इदं ब्रह्म', 'अयम् आत्मा ब्रह्म', 'तत् त्वम् असि', 'अहं ब्रह्म अस्मि' ही महावाक्ये उपनिषदांतून उद्धृत झाली आहेत. मुण्डक उपनिषदात म्हटले आहे की, त्या परमसत्याचे दर्शन झाले म्हणजे हृदयातील सर्व संशय, जळमटे निघून जातात. आत्मदर्शन झाल्यावर हृदयग्रंथी

तुटतात, संशय विरून जातात, अमृततत्त्व व अभयत्व मिळते व जीवन सार्थकी लागते, असा महिमा उपनिषदांतून व्यक्त झाला आहे. असा आत्मज्ञान झालेला मनुष्य सर्व भूतांना आपल्या ठिकाणी पाहतो व आपणास सर्वांच्या ठिकाणी पाहतो. अशा पुरुषास कोणताही मोह व कसलाही शोक राहत नाही, असे ईशोपनिषदात म्हटले आहे. अशा उपनिषदांनी मनुष्याचे परमप्राप्तव्य आत्माच आहे व आत्मकाम होणे यातच त्याची कृतकृत्यता आहे असे प्रतिपादिले आहे. कृतकृत्य ही नैतिक संकल्पना उपनिषदात आली आहे. कृतकृत्य म्हणजे ज्याने आयुष्यात आपली कर्तव्ये पूर्णपणे पार पाडली आहेत असा. 'सत्यम् वद धर्मम्चर, मातृ देवो भव पितृदेवो भव' अशा प्रकारची नैतिक तत्त्वे उपनिषदांनी आदर्श जीवनासाठी सांगितली आहेत.

मृत्यूनंतर कोणता जन्म मिळावयाचा हे या जन्मातील कर्माने ठरते. पुनर्जन्म हा अपरिहार्य आहे असे सांगून मृत्यूनंतरच्या स्थितीचे वर्णनही उपनिषदांनी केले आहे. गुरुदेव रानडे यांनी उपनिषदांची स्तुती करताना म्हटले आहे, ''उपनिषद साहित्यातील हे तत्त्वज्ञान देशोदेशीच्या साधकांच्या भौतिक, तात्त्विक आणि धार्मिक आकांक्षा पूर्ण करणारे असून, आत्मसाक्षात्काराच्या अनुभूतीसंपन्न पायावर ते उभारलेले असल्याने धर्म, जाती, संप्रदाय आदी क्षुद्र मतभेदांचा छेद घेणारी विश्वात्मकता या तत्त्वज्ञानामध्ये आहे. उपनिषदांतर्गत अनुभूतीप्रधान तत्त्वप्रणालीमध्ये धर्म, तत्त्वज्ञान आणि भौतिकशास्त्रे या त्रयींची बेमालूम सांगड घालण्यात आली आहे. बुद्धी आणि अनुभूती या दोहोंच्या साहाय्याने यांचे अध्ययन केले असता आधुनिक काळातही हे साहित्य प्रेरक ठरेल.''

आजही उपनिषदांचा अभ्यास जर्मनीसारख्या प्रगत देशात अखंडपणे सुरू आहे. आधुनिक शास्त्रांची प्रगती या औपनिषदिक तत्त्वज्ञानास पोषक आहे. भौतिक प्रगतीने मनुष्याला सर्व काही दिले आहे, पण त्याची मनःशांती मात्र तो हरवून बसला आहे. अशा काळात उपनिषदांचे हे तत्त्वज्ञान माणसाला आत्मशांतीचा व प्रसन्नतेचा मार्ग निश्चित दाखवू शकते.





## प्रश्नोपनिषदाचे स्वरूप व माहात्म्य

'प्रश्नोपनिषद' हे दशोपनिषदांपैकी चौथ्या क्रमांकाचे एक श्रेष्ठ तत्त्वज्ञानपर असे उपनिषद आहे. हे एक 'ब्राह्मण उपनिषद आहे.' ते अथर्व वेदाच्या पैप्पलाद शाखेचे उपनिषद मानले जाते. हा एक विवरणात्मक असा ग्रंथ आहे. मुण्डक नावाच्या पवित्र उपनिषदावर भाष्य करणारा हा गौर श्रुतीग्रंथ म्हणून मानला जातो.

पिप्पलाद नावाच्या श्रेष्ठ ऋषींकडे सहा शिष्य आपल्या तत्त्वज्ञानविषयक शंकांचे निरसन करून घेण्यासाठी येतात. देशाच्या निरनिराळ्या भागांतून आपल्या तत्त्वज्ञानविषयक प्रश्नांचे निराकरण करून घेण्यासाठी या श्रेष्ठ ऋषींकडे त्यांचे आगमन झाले आहे. या सहा शिष्यांची नावे अशी - कबन्धी कात्यायन, भार्गव वैदर्भि, आश्वलायन कौसल्य, गार्ग्य सौर्यायणी, सत्यकाम शैब्य, सुकेश शैब्य आणि सुकेश भागद्वाज. या सहा शिष्यांनी पिप्पलाद ऋषींना सहा प्रश्न क्रमाने विचारले आहेत. या गुरू-शिष्यांमध्ये झालेली प्रश्नोत्तरे एकूण सहा अध्यायांत ग्रथित केली आहेत. त्यामुळे अनुबंध व रचना या दृष्टीने हे एक परिपूर्ण असे उपनिषद आहे. सर्व सहा प्रश्न अत्यंत नेटकेपणाने व कौशल्यपूर्ण पद्धतीने विचारले आहेत. कात्यायनाने पहिला प्रश्न या सृष्टीच्या उत्पत्तीच्या मूलतत्त्वाविषयी विचारला व भारद्वाजाने सहावा प्रश्न परमात्म्याच्या खऱ्याखुऱ्या स्वरूपासंबंधी विचारला. या दोन प्रश्नांमध्ये प्राण, आत्मा व प्रणवज्ञान यासंबंधीचे चार प्रश्न चार आचार्यांनी विचारले आहेत.

अशा प्रकारे हे प्रश्नोत्तररूप उपनिषद असल्याने या उपनिषदास प्रश्नोपनिषद असे नाव प्राप्त झाले आहे. हे उपनिषद संपूर्णपणे गद्यात्मक आहे. त्यामुळे या ग्रंथातील वाक्यांना गद्यमंत्र म्हणजे 'वाक्य' असे म्हटले जाते. या सहा प्रश्नांनी बनलेल्या सहा अध्यायांत एकूण ६७ गद्यमंत्र म्हणजे वाक्य आहेत. या वाक्यांची अध्यायवार विभागणी पुढीलप्रमाणे - १) प्रथम प्रश्न (१६ मंत्रवाक्ये) २) द्वितीय मंत्र (१३ मंत्रवाक्ये) ३) तृतीय प्रश्न (१२ मंत्रवाक्ये) ४) चतुर्थ प्रश्न (११ मंत्रवाक्ये) ५) पंचम प्रश्न (७ मंत्रवाक्ये) ६) षष्ठ प्रश्न (८ मंत्रवाक्ये). अशा एकूण ६७ मंत्रवाक्यांनी बनलेल्या उपनिषदामध्ये पिप्पलाद ऋषींनी सृष्टी व सृष्टीकर्ता यांच्या विषयीच्या तत्त्वज्ञानविषयक समस्यांचे विवेचन सैद्धांतिक स्वरूपात केले आहे.

या सर्व मंत्रांची भाषा सोपी व सुलभ आहे. काही उपनिषदे ही काव्यमय म्हणजे मंत्र स्वरूपात असतात, तर काही उपनिषदे ही अशी गद्य स्वरूपात आढळतात. मंत्र उपनिषद हे काव्यात्मक असल्यामुळे त्याची शैली ही या गद्य स्वरूपापेक्षा थोडीशी वेगळी आढळते.

सृष्टी निर्माणशास्त्रातील परमात्म तत्त्वाच्या उपपत्तीचे प्रभावी दर्शन या उपनिषदात आढळते. पिप्पलाद ऋषी येथे सांगतात की, सृष्टीच्या आरंभी सृष्टीकर्त्याच्या मनात सृष्टी उत्पन्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली व त्या उद्देशाने त्याने तप केले. या तपातूनच त्या परमपुरुषाने जड आणि चैतन्य या दोन तत्त्वांशी साधर्म्य असणारी 'रयि व प्राण' असे द्वंद्व निर्माण केले व या द्वंद्वातूनच सारी सृष्टी निर्माण झाली. दुसऱ्या प्रश्नामध्ये प्राणदेवता व इंद्रिये यामध्ये प्राण हा श्रेष्ठतर असल्याचे समजावले आहे. या उपनिषदाच्या मते प्राण हा केवळ इंद्रियांचाच राजा नसून तो सर्व पंचमहाभूतादि देवतांचा अधिपती आहे. प्राणोत्पतीचे आद्य अधिष्ठान हा आत्मा आहे, असे तिसऱ्या प्रश्नाच्या उत्तरात प्रतिपादले आहे. असा हा आत्मा निद्रासमयी कसा जागृत असतो, याचे वर्णन चौथ्या प्रश्नाच्या उत्तरात आले आहे. याच अध्यायात निद्रा व स्वप्न यासंबंधीचे मानसशास्त्रीय विवेचनही आढळून येते. पाचव्या अध्यायात ॐकाराचे ध्यान केले असता कोणते फळ मिळते, याचे वर्णन आले आहे. असा ॐकाराचा जप करणारा हा ब्रह्मलोकास जातो, अशी फलश्रुती सांगितली आहे. शेवटच्या सहाव्या अध्यायात परमात्म्याच्या सर्वव्यापी स्वरूपाचे वर्णन आले आहे. अशा या परमात्म्यास ज्ञानाने जाणून अमरत्व प्राप्त करून घेता येते, याचे वर्णन येथे आले आहे. अशा एकूण सहा अध्यायांतही तत्त्वज्ञानविषयक चर्चा विस्तृत रूपाने आली आहे.

सहा प्रश्नांचे मुद्देसूद विवरण करणारे पिप्पलाद ऋषी ही उपनिषद काळातील एक महान विभूती होती. अथर्व वेदाचा एक आद्य संकलनकर्ता म्हणून पिप्पलाद ऋषींची ख्याती होती. ते महर्षी व्यासांच्या अथर्व वेदाच्या शिष्यपरंपरेतील देवदर्श नावाच्या आचार्यांचे शिष्य होते. पिप्पलादचा शब्दशः अर्थ पिंपळाची पाने खाऊन जगणारा (पिप्पल + अद) असा होतो. अशा या ऋषींचा निर्देश या उपनिषदात 'भगवान' अशा सन्मानार्थ उपाधीने केलेला आहे.





# प्रश्नोपनिषद

## शान्तिमंत्रः

**ओम् भद्रं कर्णेभिः - श्रृणुयाम देवाः,**
**भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।।**
**स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिः,**
**व्यशेम देवहितं यदायुः ।।**

### अन्वयार्थ

**देवाः कर्णेभिः भद्रम श्रृणुयाम** - हे देवहो, आम्ही आमच्या कानांनी (नेहमी) मंगल तेच ऐकावे. हे पूजनीय हो, आमच्या डोळ्यांनी आम्ही जे मंगल तेच पाहावे. आमच्या वाट्याला आलेल्या संपूर्ण आयुष्याचा, दृढ व बलवान शरीरावयवांनी तुझी स्तुतिस्तोत्रे गाण्यात विनियोग व्हावा;

### भावार्थ

हे देवहो! आम्ही आमच्या कानांनी नेहमी मंगलमय असावे तेच ऐकावे. हे 'पूजनीय' हो! आम्ही आमच्या नेत्रांनी जे मंगलमय असेल तेच पाहावे. आम्हाला ईशकृपेने जी आयुर्मर्यादा लाभली आहे ती आम्ही सुदृढ अंगांनी तुमची स्तुती करीत घालवावी.

**ओम् शान्तिः! शान्तिः! शान्तिः!**

# प्रश्नोपनिषद

## पहिला प्रश्न
## (प्रास्ताविक)

**सुकेशा च भारद्वाजः शैब्यश्च सत्यकामः सौर्यायणी**
**च गार्ग्यः कौसल्यश्चाश्वलायनो**
**भार्गवो वैदर्भिः कबन्धी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठा**
**परं ब्रह्मान्वेषमाणा एष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीति ते ह**
**समित्पाणयो भगवन्तं पिप्पलादमुपसन्नाः ।।१।।**

**अन्वयार्थ**
**(मंत्रवाक्य १)**

**ओम् सुकेशा भारद्वाजः** - भारद्वाजाचा पुत्र सुकेशा, **सत्यकामः शैब्यः च** - शिबीचा पुत्र सत्काम, **गार्ग्यः सौर्यायणी च** - गार्ग्य गोत्रात जन्मलेला, 'सूर्याचा' नातू 'गार्ग्य', **कौसल्यः आश्वलायनः च** - आश्वलायनाचा पुत्र कौसल्य, **भार्गवः वैदर्भिः** - विदर्भ नगरीचा भार्गव, भृगू गोत्राचा, **कबन्धी कात्यायनः च** - आणि कात्यपुत्र कबन्धी, **ते ह एते ब्रह्मपराः ब्रह्मनिष्ठाः परमब्रह्म अन्वेषमाणाः** - ते सर्व ब्रह्मनिष्ठ आणि ब्रह्मपरायण, परम ब्रह्मतत्त्वाचे अन्वेषण करणारे, **भगवन्तं पिप्पलादं** - आदरणीय पिप्पलाद ऋषी, **एषः ह वै तत्सर्वं वक्ष्यति इति ते ह** - हे (ऋषी) त्यांना प्रत्येक गोष्ट स्पष्ट करतील असा विचार करून, **समित्पाणयः उपसन्नाः** - हातात समिधा घेऊन आले.

**भावार्थ**
**सहा शिष्यांचे आगमन**

'ब्रह्मपर', 'ब्रह्मनिष्ठ' व 'परब्रह्म' समजून घेण्याची इच्छा करणारे



सुकेश भारद्वाज, सत्यकाम शैब्य, गार्ग्य सौर्यायणी, आश्वलायन कौसल्य, भार्गव वैदर्भि व कबन्धी कात्यायन असे सहाजण ब्रह्माचा शोध करण्यासाठी निघाले, आणि भगवान पिप्पलादाला हातात समिधा घेऊन शिष्यभावाने शरण गेले.

**मंत्र दुसरा**

**तान्ह स ऋषिरुवाच भूय । एव तपसा ब्रह्मचर्येण**
**श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ ।**
**यथाकामं प्रश्नान् पृच्छत ।**
**यदि विज्ञास्यामः सर्वं ह वो वक्ष्याम इति ।।२।।**

**अन्वयार्थ**
**(मंत्रवाक्य २)**

**सः □ऋषि - तान् उवाच ह** - ते ऋषी त्यांना म्हणाले, **भूयः एव** - तुम्ही पुन्हा तपस्यापूर्वक ब्रह्मचर्याने व सश्रद्धपणे एक वर्षभर (येथे) राहा. **यथाकामम् प्रश्नाव् पृच्छत** - आपआपले इच्छित प्रश्न विचारा, **यदि विज्ञास्यामः सर्वम् ह वः वक्ष्यामः इति** - मला जर ते माहीत असेल तर मी ते सर्व तुम्हाला सांगेन.

**भावार्थ**

पिप्पलाद त्यांना म्हणाले, ''तुम्ही तप करीत, ब्रह्मचर्य पाळून श्रद्धेने एक वर्ष या आश्रमात राहा. मग इच्छेप्रमाणे प्रश्न करा. जर मला माहीत असेल, तर मी उत्तर सांगेन.''

प्रथम मंत्रवाक्यात, पिप्पलाद नावाच्या महान ऋषीकडे सहा श्रेष्ठ साधक आपल्या शंका निरसन करून घेण्यासाठी आल्याचा वृत्तान्त दिला आहे. हे सर्व साधक ऋषींना शरणागत होऊन श्रद्धेने आपल्या तत्त्वज्ञानविषयक प्रश्नांची उत्तरे शोधण्यासाठी अत्यंत जिज्ञासू वृत्तीने आले आहेत. येथून प्रश्नोपनिषदाची सुरुवात होते. या पहिल्या मंत्रवाक्यात या सहा साधकांचे काही गुणविशेष वर्णन केले आहेत. हे सर्वजण वेदविद्या जाणणारे, अध्यात्म विद्येमध्ये पारंगत असलेले व प्रत्यक्ष साधना करणारे असे उत्तम शिष्य आहेत. म्हणून त्यांचे वर्णन 'ब्रह्मनिष्ठ' व 'ब्रह्मपरा' या संज्ञांनी केलेले आहे. साधकाच्या मनामध्ये

ब्रह्मजिज्ञासेची तीव्र उत्कंठा होणे हे आत्मज्ञान मिळविण्याच्या मार्गातील पहिले प्रमुख तत्त्व आहे. परमार्थ मार्गातील पहिल्या प्राथमिक सोपानांचे ज्ञान आत्मसात केल्यानंतर उच्च कोटीचे परमतत्त्वाचे विज्ञान जाणून घेण्यासाठी हे शिष्य पिप्पलाद ऋषींकडे आले आहेत. शिष्याने आत्मज्ञान कसे प्राप्त करून घ्यावे याचे उत्तम मार्गदर्शन गीतेमध्ये भगवान श्रीकृष्णानी चौथ्या अध्यायात सांगितले आहे.

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ।।३४।।**

**अर्थ (अध्याय ४, श्लोक ३४) :** ध्यानात ठेव की, ते ज्ञान प्रणिपाताने, प्रश्नाने आणि सेवेने तत्त्ववेत्ते ज्ञानी पुरुष तुला उपदेशितील.

तत्त्वार्थ म्हणजे परिपूर्णत्वाचे, अपराविद्येचे ज्ञान करून घेण्यासाठी हे शिष्य समर्थ गुरूकडे आले आहेत. येताना त्यांनी आपल्याबरोबर गुरूंना अर्पण करण्यासाठी समिधा आणलेल्या आहेत. समिधा हे स्वशरणागतीचे व त्याचबरोबर आपली पात्रता सिद्ध करण्याचे एक सुचिन्हच असे. आचार्यांकडे जाताना आपल्या समर्पित श्रद्धेचे व निष्ठेचे प्रतीक असलेली समिधा अर्पण करण्याची प्रथा त्या काळी होती. या सहा शिष्यांचे सहा प्रश्न हाच प्रश्नोपनिषदाचा मुख्य विषय आहे.

दुसऱ्या मंत्रवाक्यात पिप्पलाद ऋषींनी या सर्व शिष्यांना एक वर्षभर तप करण्यास सांगितले. एक वर्ष श्रद्धेने ब्रह्मचर्य पाळून राहिल्यानंतर मग तुम्ही प्रश्न विचारा. त्या प्रश्नांची उत्तरे देण्यास मी जर समर्थ असेन तर मी निश्चित देईन, असे अभिवचन ऋषींनी आपल्या शिष्यांना दिले. या सर्व शब्दांतून पिप्पलाद ऋषींची निरहंकारी, विनम्र वृत्ती दिसून येते. अपराविद्येचे ज्ञान सहजासहजी विनासायास देणे हे यथोचित नाही हे समजूनच ऋषींनी आपल्या शिष्यांना एक वर्ष कठोर साधनेत व्यतीत करण्याचा आदेश दिला. अंतःकरणशुद्धी झाल्याशिवाय असे ज्ञान प्रतिष्ठित होत नाही आणि अशा शुद्धीसाठी ब्रह्मचर्यासारखे नीतिनियमांचे कठोर पालन, सदाचार, नीतिमूल्यांचे पालन ही साधकाला अत्यंत आवश्यक अशी जीवन साधना आहे. ऋषींनी घातलेली ही अट शिष्यांना त्यांची योग्यता सिद्ध करण्यासाठी, ही त्यांची सत्त्वपरीक्षाच होती.



## मंत्र तिसरा

### कुतः प्रजा?

**अथ कबन्धी कात्यायन उपेत्य पप्रच्छ भगवन् कुतो ह वा इमाः प्रजाः प्रजायन्त इति ।।३।।**

### अन्वयार्थ

नंतर कात्यायन कुलोत्पन्न कबन्धीने (पिप्पलाद ऋषींकडे) येऊन विचारले, **भगवन् इमाः प्रजाः कुतः ह वा प्रजायन्त इति** - महाराज ही जीवसृष्टी कोठून (कशापासून) उत्पन्न होते?

### भावार्थ

**प्रजा कशी उत्पन्न झाली?**

नंतर कात्यायन कुलोत्पन्न कबन्धीने येऊन विचारले, "महाराज, ही जीवसृष्टी कोठून (कशापासून) उत्पन्न होते, असा माझा प्रश्न आहे."

तिसऱ्या मंत्रवाक्यात कात्यायन कुलोत्पन्न कबन्धीने अत्यंत मूलभूत असा प्रश्न विचारला. या सृष्टीतील ही सर्व प्रजा कशी उत्पन्न झाली, हा तो प्रश्न आहे. या पहिल्या अध्यायात सृष्टीनिर्मितीच्या प्रक्रियेचे वर्णन आले आहे. या एका प्रश्नावर पिप्पलाद ऋषी चौथ्या मंत्रवाक्यापासून विवेचन करणार आहेत. सृष्टीनिर्मितीचा प्रश्न हा अनाधी काळापासून सर्वांचे कुतूहल जागविणारा असा प्रश्न आहे.

## मंत्र चवथा

### प्रजापतिकृता सृष्टिनिर्मितिः

**तस्मै स होवाच । प्रजाकामो वै प्रजापतिः । स तपोऽतप्यत स तपस्तप्त्वा स मिथुनमुत्पादयते रयिं च प्राणं चेति । एतौ मे बहुधा प्रजाः करिष्यत इति ।।४।।**

### अन्वयार्थ

ते त्याला म्हणाले की, प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा करणाऱ्या त्या प्रजापतिने, **तप अतप्यत** - तप करण्याचे निश्चित केले, **सः तपः तप्त्वा** - त्याने तप करून त्याने प्रकृती (रयि) आणि चैतन्य (प्राण) अशी एक जोडी निर्मिली, **एतो मे बहुधा प्रजाः करिष्यतः** - (असा विचार करून की) ते एकत्रितपणे, आपआपसात, अनेक प्रकारांनी प्रजोत्पती करतील.

### भावार्थ

त्यांनी उत्तर दिले की, प्रजापति - प्राणिमात्रांचा परमेश्वर याने तप करण्याचा निश्चय केला आणि तप करून त्याने प्रकृती (रयि) आणि चैतन्य (प्राण) अशी एक जोडी निर्मिली; उद्देश हा की, ते एकत्रितपणे आपापसात अनेक प्रकारांनी प्राणिमात्र उत्पन्न करतील.

## रयि आणि प्राण यांची प्रथम निर्मिती

ईश्वराच्या मनात विचार आला की, आपण आता अनेकविध व्हावे. अनेक प्रकारच्या अनेकविध रूपांत स्वतःच विस्तारावे, अशी इच्छा ब्रह्मदेवाला झाली. ईश्वराच्या या चिंतनातून निष्क्रिय असे वस्तुतत्त्व आणि क्रियावान असे जीवतत्त्व उत्पन्न झाले. ईश्वराच्या चिंतनाचे, तपाचे फळ म्हणून हे रयि व प्राण असे पतिपत्नीचे जोडपेच निर्माण झाले. सूर्य हा पती आहे व चंद्र ही पत्नी. सूर्य हेच पृथ्वीवरील जीवतत्त्व आहे. सूर्याचे किरण जिथे जिथे जातात तिथे ते जीवतत्त्व परिपुष्ट करतात. सूर्य हा जीवतत्त्वाचा वर्धक आहे. चंद्राच्या दर्शनात याचे रोपण करावयाचे व सूर्याच्या प्रकाशात त्याचे संवर्धन करायचे या मिथुनानीच मूलतः निराकार असे वस्तुतत्त्व आणि जीव यांच्या संयोगाने नाना प्रकारची जीवसृष्टी उत्पन्न झाली आहे. चंद्र व अन्न हे रयिस्वरूप असून सूर्य व अग्नी हे प्राणस्वरूप होत. सूर्य-चंद्र निर्माण झाल्यामुळेच पृथ्वीला गती मिळाली. या गतीतून महिने, पंधरवडे, दिवस व रात्र हे निर्माण झाले. सूर्याचे दक्षिणोत्तर फिरणे आणि दिवस-रात्री या ज्या गोष्टी पृथ्वीच्या गतीमुळे सुरू झाल्या त्यामुळेच पृथ्वीवर जीवसृष्टी उत्पन्न होणे शक्य झाले. पृथ्वीवरील रयिस्वरूप असलेल्या अन्नामुळेच प्राण जीवाच्या ठिकाणी राहतात. अन्नामुळे नरबीज म्हणजे रेत उत्पन्न होते. अग्नीमुळे हे अन्न पचून त्याचा प्राणरस



निर्माण होतो. वैश्वानररूपाने आपणच चार प्रकारचे अन्न या देहात पचवितो, असे भगवंत गीतेमध्ये सांगतात. अन्नरसापासून जे वीर्य निर्माण होते त्यापासून अनेक प्रकारच्या प्रजा निर्माण होतात. हे मिथुन रयि आणि प्राण यांनी घटित होते. परमेश्वर अग्नी होऊन प्राण्यांच्या शरीरात प्रवेश करतो म्हणून प्राणाला अग्नी असे म्हटले आहे व भोग्य पदार्थांचा चंद्रकिरणांशी नित्य संबंध असतो म्हणून रयिला चंद्र असे म्हटले आहे. प्रजापित्याने स्वतःच्या संकल्पसिद्धीसाठी भोग्यवस्तू आणि त्यांचे भोक्ते यांचे मूळ स्वरूप जे सूर्य-चंद्र ते मिथुनाच्या रूपात त्याने निर्माण केले. प्रकृती आणि प्रेरक शक्ती हीच ती जोडी.

### मंत्र पाचवा

**आदित्यो ह वै प्राणो रयिरेव चन्द्रमाः**
**रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च ।**
**तस्मान्मूर्तिरेव रयिः ।।५।।**

### अन्वयार्थ

आदित्य हाच खरोखर प्राण (आहे); **चंद्रमाः रयि एव (अस्ति)** - चंद्र हाच प्रकृती (रयि) आहे. जे जे काही साकार आहे. (पृथ्वी, जल, तेज इ.) आणि जे काही आकारविरहित आहे. (आकाश वायू इ.) **एतत् सर्वं रयि-** ते सर्व प्रकृती आहे; **तस्मात् मूर्ति एव रयिः** - म्हणून मूर्तिमात्र (जी दिसतात व जाणवली जातात अशा सर्व वस्तू) प्रकृती (आहेत).

### भावार्थ

सूर्य हाच प्राण आणि चंद्र रयि आहे; आणि ज्या सर्वाला आकार आहे आणि जे सर्व आकाराशिवाय आहे ते रयि आहे आणि म्हणून आकार हीच रयि होय.

## आदित्यस्वरूप प्राण व चंद्रस्वरूप प्रकृती

आदित्य म्हणजे प्राण व तोच उपभोक्ता अग्नी आहे. सर्व भोग्यविषय रयि म्हणजे चंद्रमा आहे. रयि म्हणजे अन्न अथवा सोम होय. या सर्वच विश्वामध्ये प्रजापति आत्मा होय. खाणाराही तोच व खाण्याचे अन्नही तोच असे याचे स्वरूप आहे. म्हणूनच श्रुति म्हणते, "हे सर्व विश्व आपणहून

त्यात प्रवेशकरिता झाला.'' थोडक्यात, भोग्यविषय आणि भोक्ता यांचे उत्पादकत्व हिरण्यगर्भाकडे असून तोच हे सर्व विश्व नटून राहिला आहे. एवढे अभिन्नत्व असूनही तो मिथुनरूपी झाला आहे. या दृष्टीने सर्व मूर्त किंवा अमूर्त वस्तू यात भेदाभेद राहत नाही. सर्व भोग्यजात विषय म्हणजे सर्व मूतामूर्त वस्तू या रयिच आहेत. रयि स्वरूपाने पृथ्वी, जल, तेज, वायू आणि आकाश एक स्वरूप आहेत. त्यातील वायू आणि आकाश अमूर्त आणि बाकीची महाभूते मूर्त आहेत. प्रजापतिच्या दृष्टीने सर्व वस्तूंचा अंतर्भाव रयिमध्ये होतो. तसे सर्वच पदार्थ रय्यात्मक व प्राणात्मक असतात, म्हणून रयिस व प्राणास मिळून एक ईश्वररूपच येते. प्रजापति स्वतःमध्ये प्रकृती आणि प्रेरकशक्ती म्हणजे चंद्र व सूर्य हे प्रगट करतो. प्रजापति हा स्वतःच चंद्र आणि सूर्य म्हणून या जगतात प्रकृती आणि प्राणशक्ती या नात्याने क्रीडा करीत आहे.

## मंत्र सहावा

**अथाऽऽऽदित्य उदयन् यत्प्राचीं दिशं प्रविशति तेन ।**
**प्राच्यान्प्राणान् रश्मिषु संनिधत्ते । यद्दक्षिणां यत्प्रतीचीं**
**यदुदीचीं यदधो यदूर्ध्वं यदन्तरादिशो यत्सर्वं प्रकाशयति**
**तेन सर्वान् प्राणान् रश्मिषु संनिधत्ते ।।६।।**

### अन्वयार्थ

(रात्रीनंतर) जेव्हा सूर्य उदय पावत असतो; जो पूर्वेकडे प्रवेश करतो; **तेन रश्मिषु प्राच्यान् प्राणान् सन्निधत्ते** – तो आपल्या किरणांत पूर्व दिशेला उपयोगी पडणारे प्राण चेतनाशक्ती ठेवतो. जो दक्षिण, पश्चिम, उत्तर दिशा, ऊर्ध्व, अधर आणि अंतर दिशांना सर्वत्र प्रकाशित करतो. **तेन् सर्वान् प्राणान् रश्मिषु सन्निधत्ते** – त्यायोगे सर्व प्राणांना आपल्या किरणात स्पंदित करतो.

### भावार्थ

आता सूर्य पूर्वेकडे उदय पावतो त्या वेळी तो आपल्या किरणांत पूर्व दिशेतील प्राणास समाविष्ट करतो, तो दक्षिण, पश्चिम, उत्तर दिशा, ऊर्ध्व, अधर आणि अंतर दिशा सर्व प्रकाशित करतो. त्यामुळेच तो सृष्टिमात्रांना त्याच्या किरणांनी रोमांचित करतो.



## मंत्र सातवा

**स एष वैश्वानरो विश्वरूपः प्राणोऽग्निरूदयते ।**
**तदेतदृचाभ्युक्तम् ।।७।।**

### अन्वयार्थ

हा उगवतो तो **वैश्वानर विश्वरूपः प्राणः अग्निः** – विश्वरूप प्राण (व) अग्नी; **तत एतत ऋचा अभ्युक्तम्** – ते हे (पुढील) ऋचेने (मंत्राने) ऋग्वेदात वर्णिले आहे.

### भावार्थ

तो वैश्वानर, सर्व प्राणिमात्रांची एकूण बेरीज सर्व रूपे धारण करणारा 'प्राण' हाच दररोज उदय पावणारा अग्नी आहे. हे 'ऋग्वेदाच्या' पुढील ऋचेत देखील सांगितलेले आहे.

## मंत्र आठवा

**विश्वरूपं हरिणं जातवेदसं**
**परायणं ज्योतिरेकं तपन्तम् ।**
**सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः**
**प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ।।८।।**

### अन्वयार्थ

**विश्वरूपं हरिणं जातवेसदसं परायणं ज्योतिरेकं तपन्तम** – सर्वरूपात्मक, देदीप्यमान, सर्वज्ञ, सर्वाधार, प्रकाशतत्त्व, उष्णता देणारा **सहस्ररश्मि शतधा वर्तमानः प्रजानाम्, एषः सूर्यः उदयति** – असंख्य किरणांनी, असंख्य स्वरूपांनी असणारा, प्राणिमात्रांचा प्राण असणारा असा हा सूर्य उदय पावतो.

### भावार्थ

जो सर्वरूपात्मक, देदीप्यमान, सर्वज्ञ, श्रेष्ठतम ध्येय, प्रकाशतत्त्व, उष्णता देणारा आहे तो हाच सहस्ररश्मी सूर्य सर्व प्राणिमात्रांचे जीवनतत्त्व म्हणून सहस्ररूपात अस्तित्वात असणारा आहे, हे जाणकार जाणतात.

## प्राणस्वरूप सूर्याचा महिमा

सूर्य पूर्वेला उगवताच त्याचे किरण सर्व दिशांसह संपूर्ण विश्वाला जागृत करतात व त्यांना प्राणस्वरूप बनवतात. सूर्य उदय पावला की पूर्व दिशा आपल्या प्रकाशाने व्यापून टाकतो. आपल्या किरणांनी सर्व वस्तूंना आंतरर्बाह्य प्रकाशित करतो. दक्षिण, पश्चिम, उत्तर अशा सर्व दिशांत असणाऱ्यांना तो आत्मरूप करतो. सर्वांस प्राणरूप करून चैतन्य प्रदान करतो. या विश्वातील यच्चयावत वस्तू परमार्थः प्राणरूपच आहेत, पण हा आपल्या प्रकाशाने त्या प्राणांना जागे करतो. तोच वैश्वनर म्हणून भोक्ता या स्वरूपात सर्व जीवांचा आत्मा झाला आहे म्हणून तो विश्वरूपही आहे. तोच प्राण, तोच अग्नी असे त्याचे स्वरूप आहे. रोज उदय पावून सर्व दिशांस चेतनामय करणारा तो सर्व प्राणरूप आहे. अशा सूर्याचा महिमा ऋग्वेदातील एका मंत्राने स्पष्ट केला आहे.

आठवा जो मंत्र आहे तो हा ऋग्वेदातील मंत्र आहे. यात सूर्याचे माहात्म्य वर्णन केले आहे. ते असे, ''तो विश्वरूप आहे, स्वयंप्रकाशी आहे, त्याच्याच आश्रयाने सर्व प्राण विद्यमान असतात. तो प्रकाशस्वरूप आहे आणि त्याच्या स्वरूपात कोणत्याही प्रकारचा भेद नाही. सर्व प्राण्यांच्या नेत्रातील प्रकाशशक्ती त्याचीच आहे. सर्वांस आंतर्बाह्य उष्णता पुरविणारा तोच एकमेव सूर्य आहे. आपल्या सहस्र, अनंतरूपी किरणांनी तो सर्व व्यवहाराचा नियामक झाला आहे. तो उदय पावल्यावरच प्राण्यांचे सर्व व्यवहार सुरू होतात.'' असा हा प्रकाशक, सर्वज्ञ, विश्वरूप, सर्वाधार, तेजस्वरूप, सूर्याचा महिमा ऋग्वेदातील या मंत्रात वर्णन केला आहे.

### मंत्र नववा

**संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च ।**
**तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते ।**
**ते चान्द्रमसमेव लोकमभिजयन्ते त एव पुनरावर्तन्ते ।**
**तस्मादेत ऋषयः प्रजाकामा दक्षिणं प्रतिपद्यन्ते ।**
**एष ह वै रयिर्यः पितृयाणः ।।९।।**



### अन्वयार्थ

**संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते ते चान्द्रमसमेव लोकमभिजयन्ते** - (बारा महिन्यांचा काल) तत्त्वतः प्रजापति आहे; त्याची दक्षिण व उत्तर अशी दोन अयने (जाण्याचा मार्ग) आहेत. जे (लोक) यज्ञ आणि पुण्यकर्माचे आचरण करून केवळ 'कर्ममार्ग' अनुसरतात ते 'चंद्रलोकां'ची प्राप्ती करून घेतात; **ते एव पुनरावर्तन्ते** - आणि निश्चितपणे ते तेथून माघारी परत येतात; **तस्मात् एते प्रताकामाः ऋषयः दक्षिणम् प्रतिपद्यन्तेः** - म्हणून असे उपभोगेच्छू ऋषी दक्षिणायन् मागाला जातात; **एष ह वै रयिः यः पितृयाणः** - हीच वास्तविक 'रयि' जो पितृयान मार्ग आहे.

### भावार्थ

संवत्सर तत्त्वतः 'प्रजापति' आहे आणि त्यात दक्षिणायन व उत्तरायण असे दोन मार्ग आहेत. जे यज्ञकर्म आणि पुण्यकर्माचे आचरण करून केवळ 'कर्ममार्गा'चेच आचरण करतात त्यांना 'चंद्रलोकां'ची प्राप्ती होते आणि निश्चितपणे ते परत येतात. म्हणून हे महात्मे संतानाची इच्छा (भोगाची इच्छा) करतात ते 'दक्षिणायन' मार्ग स्वीकारतात. ही प्रकृती (रयि) खरोखरच 'पितरांचा मार्ग' आहे.

### मंत्र दहावा

**अथोत्तरेण तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया**
**विद्ययाऽऽत्मानमन्विष्याऽऽदित्यमभिजयन्तेः**
**एतद्वै प्राणानामायतनमेतदमृतमभयमेतत्परा -**
**यणमेतस्मान्न पुनरावर्तन्त इत्येष निरोधस्तदेष श्लोकः ।।१०।।**

### अन्वयार्थ

**अथोत्तरेण.....आन्विष्य....** - आणि (ज्यांनी) तपाचरणाने, इंद्रियनिग्रहाने, श्रद्धेने आणि विद्या प्राप्त करून घेऊन आत्मतत्त्वाचा शोध घेतला; **उत्तरेण आदित्यम् अभिजयन्ते** - (ते) उत्तरायण मार्गाने आदित्य (सूर्य) लोक प्राप्त करून घेतात, **एतत् वै प्राणानाम् आयतनम्**

– हे सर्व प्राणिमात्रांचे आश्रयस्थान (ध्येय) आहे; **एतद् अमृतम् अभयम्, एतत् परायणम्** – हे अविनाशी, भयरहित (आहे) ही परमगती (आहे); (अशा) या स्थानापासून ते पुन्हा परत येत नाहीत; **इति एषः निरोधः** – असा ह्याचा नियम आहे, **तदेष श्लोकः** – त्याच्याविषयी हा श्लोक (मंत्र) आहे.

**भावार्थ**

आणि ज्यांनी तपाचरणाने, इंद्रियनिग्रहाने, श्रद्धेने आणि ज्ञान प्राप्त करून घेऊन आत्मतत्त्वाचा शोध घेतला आहे ते उत्तरायण मार्गाने आदित्य लोक प्राप्त करून घेतात. हे सर्व प्राणिमात्रांचे आश्रयस्थान (आहे). अविनाशी, 'भयरहित', अशी ही परमगती आहे. अशा या स्थानापासून ते पुन्हा परत येत नाहीत, असा नियम आहे. ह्याच्याविषयी हा पुढील मंत्र आहे.

## दक्षिणायन व उत्तरायण मार्गाची फळे

प्रजापति हाच संवत्सर म्हणजे काल आहे. प्रजापति म्हणजे चंद्र आणि सूर्य यांचे मिथुन असा अर्थ येथे अभिप्रेत आहे. या संवत्सरातील अहोरात्रींचा निर्माता सूर्य आहे आणि तिथींचा नियामक चंद्र आहे. तिथी व अहोरात्री या उभयतांच्या सहकारीत्वाने संवत्सराची घटना होते म्हणून चंद्र-सूर्य मिथुनाने उत्पन्न झालेल्या संवत्सराला प्रजापति असे म्हटले आहे. या संवत्सराचे दोन गमन मार्ग प्रसिद्ध आहेत. एक दक्षिणायन व दुसरा उत्तरायण. सूर्य उत्तर मार्गाने जाऊ लागला म्हणजे त्या कालाला उत्तरायण व दक्षिणेकडे वळला म्हणजे त्याला दक्षिणायन म्हणतात. त्यात 'इष्टापूर्त' म्हणजे यज्ञयागादि अशा कर्ममार्गाचे अनुसरण करतात त्यांना दक्षिण मार्गाने पितृलोकासारख्या लोकांची गती मिळते. असे लोक समाजकार्य करण्यासाठी धर्मशाळा, देवळे, अन्नछत्रे वगैरे कर्मे करून पुण्य संपादन करतात. पण हे करत असताना लोकेशणासारख्या अनेक ईषणांनी ग्रासलेले असतात. असे हे इष्टपूर्तीचे उपासक चांद्रमस लोकांमध्ये प्रवेश करतात. चंद्रलोकात प्रवेश करणाऱ्या लोकांची क्षयवृद्धी होते म्हणजे त्यांना पुनःपुन्हा जन्म-मरण घ्यावे लागते. कारण या सर्व लोकांची उपासना अन्नात्मक प्रजापतिची असते व या उपासनेचे फळ हे असे चंद्रात्मक असते. या मार्गाला पितृयान असेही नाव आहे. सकाम कर्मे



करणारे असे हे लोक विकार पावणाऱ्या चंद्रलोकाप्रत जातात व पुनःपुन्हा जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडतात.

१० व्या मंत्रात उत्तरायण मार्गाच्या उपासकांचे वर्णन आले आहे. तप, निष्काम ब्रह्मचर्य, निष्काम श्रद्धा आणि आत्मविद्या यांचा आश्रय करून असे लोक प्राणरूप आदित्य मार्गाचा स्वीकार करतात. आदित्य हा प्रजापतिचा अंश आहे आणि तो निर्विकार आहे. आदित्य हा अविनाशी असून निर्भयता देणारा आहे. चंद्राप्रमाणे आदित्याला क्षयवृद्धीची उपाधी नाही. ज्ञानमार्गाने जाणाऱ्या निष्काम कर्मयोग्यांना या मार्गाने श्रेष्ठगती प्राप्त होते व त्याला जन्म-मरणाच्या रहाटगाडग्यातून मुक्तता प्राप्त होते. असे लोक सूर्यमार्गाने ब्रह्मलोकात जातात व त्या परमतत्त्वाशीच एकरूप होतात. अशा प्राणस्वरूप सूर्याच्या उपासनेत राहणाऱ्या साधकांना आत्मज्ञानाची ओढ असते. त्यामुळे आत्मशुद्धीसाठी सर्व प्रकारचे तप आणि यमनियम पाळून या मार्गासाठी ते पात्र झालेले असतात.

## मंत्र अकरावा

**पञ्चपादं पितरं द्वादशाकृतिं**
**दिव आहुः परे अर्धे पुरिषिणम् ।**
**अथेमे अन्य उपरे विचक्षणं**
**सप्तचक्रे षडर आहुरर्पितमिति ।।११।।**

**अन्वयार्थ**

**पञ्चपादं ....** – (कैक लोक या सूर्यनारायणाला) पाच पाय असलेला (सहा ऋतूंपैकी हेमंत व शिशिर एकत्र करून होणारे. या ऋतूंचा जणूकाही पायाप्रमाणे उपयोग करून आदित्य आपले आवर्तन करीत असतो); **पितरम्** – सर्वांचा पिता (सर्व वस्तूंचे उत्पादकत्व त्याच्याकडे जात असल्याने), **द्वादश आकृतिम्** – बारा आकृती असलेला (बारा महिने हेच जणू त्याला आकृती देणारे अवयव आहेत); अंतरिक्ष लोकांच्याही वर (स्थित) असणारा (अंतरिक्ष) – स्वर्गलोकही त्याच्यामुळेच प्रकाशित होतो); – जलाचा उत्पादक (सर्वांना जलरूप जीवन देणारा म्हणूनही त्यांचा पिता); **आहुः** – म्हणतात; **अथ इमे अन्ये उपरे** – दुसरे काही लोक; **इति आहुः** – असे म्हणतात की तो; **विचक्षणं** –

सर्वज्ञ (आहे); **सप्तचक्रे** - सात (अश्वरूप) चक्राच्या; **षडरे** - (त्यापैकी प्रत्येकाला) सहा (षडऋतुरूपी) आरे असलेल्या (रथाच्या ठिकाणी) (हे सर्वजगत्) **अर्पितम्** - अर्पिलेले (स्थित केलेले) आहे.

### भावार्थ

मुनी म्हणतात की, हा (सूर्य) पाच पाय असलेला, सर्वांचा पिता, बारा रूपे असलेला, पाण्याचा (पर्जन्याचा) परमेश्वर असा, अंतरिक्षाच्या वरच्या भागात आसनस्थ आहे. इतर काही त्याला सर्वज्ञ व सहा आऱ्यांचे एक चाक असलेल्या, सात अश्वांकडून ओढल्या जाणाऱ्या रथाप्रमाणे, त्याच्यावर सर्व जग आरूढ झाले आहे असा, असल्याचे म्हणतात.

## संवत्सररूप सूर्यवर्णन

संवत्सराला काहीजण पाच पाय आणि बारा अवयव आहेत असे म्हणतात व काही दुसरे लोक तो सप्तचक्राच्या व सहा अऱ्या असणाऱ्या रथात बसला आहे असे म्हणतात. येथे पाय म्हणजे ऋतू. वर्षाचे सहा ऋतू असतात. त्यापैकी हेमंत व शिशिर हे दोन ऋतू एक केले म्हणजे वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद आणि हेमंत असे पाच ऋतू शिल्लक राहतात. या पाच पायांनी संवत्सररूपी आदित्य भ्रमण करीत असतो. वर्षातील द्वादशमास हे त्याचे अवयव आहेत. आदित्यापासूनच पर्जन्यवृष्टी होते म्हणून त्याला उदकवंत असे म्हटले आहे. या सूर्याला पाच पाय व बारा अवयव असून हा प्रजन्याचा उत्पादक आणि सर्व चराचरांचा जन्मदाता आहे, असे ज्ञानी लोक म्हणतात. आता दुसरे काही पंडित लोक असे म्हणतात की, हा संवत्सरात्मक आदित्य सर्वज्ञ असून सात चाके असणाऱ्या रथात तो बसलेला आहे. येथे चक्र याचा अर्थ अश्व असा आहे. नित्य गमन करणारा जो काल त्याचा आत्मा हा आदित्य आहे. याच्या रथाला षड्ऋतूंचे सहा अरे आहेत. रथाच्या तुंब्यामध्ये जशा त्याच्या अऱ्या जाऊन मिळतात त्याप्रमाणे सर्व जगत या आदित्यामध्ये अर्पित झाले आहे. बारा महिने हेच अवयव असलेल्या व सप्तरंगांच्या किरणाबरोबर धावणाऱ्या आदित्यरूपी कालचक्रातच सर्व जग अंतर्भूत झाले आहे.



### मंत्र बारावा

**मासो वै प्रजापतिस्तस्य कृष्णपक्ष एव रयिः**
**शुक्लः प्राणस्तमादेत ऋषयः**
**शुक्ल इष्टं कुर्वन्तीतर इतरस्मिन् ॥१२॥**

### अन्वयार्थ

**मासः वै प्रजापतिः** - महिना 'प्रजापति'चेच स्वरूप आहे; (कृष्ण पक्ष हा त्याची जणू रयि;) **शुक्ल प्राणाः** - शुक्ल पक्ष प्राण, शक्ती म्हणून हे महान् ऋषी शुक्ल पक्षात यज्ञादी इष्टकर्मे करतात; **इतरे इतरस्मिन्** - दुसरे दुसऱ्यात.

### भावार्थ

महिना (मास) 'प्रजापति' आहे. त्याचा कृष्ण पंधरवडा हा खरोखर रयि आहे. त्याचा शुक्ल पंधरवडा प्राण - शक्ती आहे. म्हणून हे महान ऋषी महिन्याच्या शुक्ल पंधरवड्यात यज्ञादी इष्टकर्मे करतात आणि दुसरे लोक कृष्ण पंधरवड्यात करतात.

## मासस्वरूप प्रजापति

ज्ञानी लोक आपला आत्मा सूर्य आहे असे समजून आपली सर्व नित्य कर्तव्ये शुक्ल पक्षात करतात आणि हे ज्ञान ज्यांना नाही ते कृष्ण पक्षामध्ये आपली कर्तव्ये करतात. शुक्ल व कृष्ण पक्ष असे दोन पक्ष महिन्यामध्ये असून ते प्रजापतिरूपच आहेत. यातील कृष्ण पक्ष हा अन्न अथवा रयिचे प्रतीक असून शुक्ल पक्ष हा प्राणाचे प्रतीक आहे. जे केवळ देहात्मकतेने विषय भोगात रममाण झालेले असतात ते कृष्ण पक्षाचे प्रतीक आहेत. अशा लोकांची उपासना ही सकाम स्वरूपाची असते. त्यामुळे ब्रह्म, प्राण इत्यादिकांचे ज्ञान त्यांना मुळीच नसते. पण शुक्ल पक्ष हा दुसरा भाग प्रजापतिचा प्राण आहे. शुक्ल पक्षाचा जो प्राण तो सर्वव्यापी आहे. असे ज्ञान डोळस साधकांना झालेले असते. ज्यांना असे ज्ञान झालेले असते त्यांनी शुक्ल पक्षात केलेल्या यज्ञाचे उत्तम फळ प्राप्त होते. अशी प्राणदृष्टी ज्यांना नाही त्या अज्ञानी लोकांना मात्र शुक्ल पक्षातसुद्धा केलेल्या यज्ञाचे फळ मिळत नाही. म्हणजेच अज्ञानी लोकांनी शुभकालात केलेले कर्मसुद्धा परिणामी दुःखकारक होते.

## मंत्र तेरावा

**अहोरात्रो वै प्रजापतिस्तस्याहरेव प्राणो रात्रिरेव रयिः ।**
**प्राणं वा एते प्रस्कन्दति ये दिवा रत्या संयुज्यन्ते ।**
**ब्रह्मचर्यमेव तद्यद्रात्रौ रत्या संयुज्यन्ते ।।१३।।**

### अन्वयार्थ

**अहः रात्रः वै प्रजापतिः** - दिवस-रात्र हेही प्रजापति होत, **अहः तस्य प्राणः एव** - दिवस त्याचा प्राणच, **रात्रिः रयिः एव** - (आणि) रात्र रयि होय - जे दिवसा रतिसंभोग करतात ते प्राणशक्ती गमावतात; **(ये) रात्रौ रत्या संयुज्यन्ते तत् ब्रह्मचर्यम् एव** - तर जे रात्री रतिसंभोग करतात, त्यांचे ते ब्रह्मचर्यच होते.

### भावार्थ

हा सुद्धा 'प्रजापति'च आहे; त्याचा दिवसाचा काल हा 'प्राण'रूप आणि रात्रीचा काल हे 'रयि'रूप होय. जे दिवसा रतिसंभोग करतात ते प्राणशक्ती गमावतात; तर जे रात्री रतिसंभोग करतात त्यांना खरे म्हणजे ब्रह्मचारीच समजावयास हवे.

## दिनरात्ररूप प्रजापति

१२ व्या मंत्रापर्यंत अवयव स्वरूप प्रजापतिचे वर्णन आपण पाहिले. आता या मंत्रात दिवस व रात्र हेही मिथुन प्रजापतिच आहेत हे सांगायचे आहे. अहोरात्र हा प्रजापति आहे. त्यातील दिवस हा प्राण आणि रात्री हे अन्नरयि आहे, म्हणून जे दिवसा स्त्रीचा उपभोग घेतात ते प्राणाला बाहेर टाकून देतात पण जे रात्री उपभोग घेतात त्यांचे आचरण हे ब्रह्मचर्यात्मक असते. रात्री ही अन्नरूप रयि किंवा चंद्रमा होय. म्हणून शहाण्या पुरुषाने दिवसा स्त्रीसंग करू नये, असा उपदेश या मंत्रात केला आहे. सूर्योदयाच्या वेळी प्राणशक्ती उत्साहित असते. अशी शक्ती जर प्रणयक्रीडेत खर्च केली तर उत्तम साधना होणार नाही. परंतु रात्री मात्र प्राणशक्ती क्षीण असताना रतिक्रीडा झाली तर या उत्साहाला बाधा येत नाही. येथे उपनिषदाने जो नियम घालून दिला आहे तो व्यावहारिक दृष्ट्यासुद्धा अनुकरणीय आहे. या मंत्रातून दिवस आणि रात्र



हेही प्रजापतिच आहेत असे वर्णन केले आहे. दिवस हा प्राणशक्तीस समर्पित आहे आणि रात्रीवर रयिचे अधिपत्य असते, असे विधान ऋषींनी येथे केले आहे.

## मंत्र चौदावा

**अन्नं वै प्रजापतिस्ततो ह वै तद्रेतस्तस्मादिमाः प्रजाः प्रजायन्त इति ।।१४।।**

### अन्वयार्थ

**अन्नं वै प्रजापतिः** - अन्न हेही खरोखर 'प्रजापति'च आहे, **ततः ह वै रेतः** - त्यापासून प्राणिबीज (वीर्य) उत्पन्न होते; **तस्मात् इमाः प्रजाः प्रजायन्ते इति** - त्यापासून हे सर्व प्राणी उत्पन्न होतात.

### भावार्थ

अन्न हेही खरोखर 'प्रजापति'च आहे. त्यापासून प्राणिबीज (वीर्य) उत्पन्न होते, त्या वीर्यद्रवापासून हे सर्व प्राणी जन्मतात.

## अन्नस्वरूप प्रजापति

वरील मंत्रात अन्न हेच प्रजापतिस्वरूप आहे असे वर्णन केले आहे. याप्रमाणे रयि, प्राण, संवत्सर, मास, अहोरात्र अशा क्रमाने प्रजापतिचे वर्णन आले आहे. प्रथम तो रयि (प्रकृती) आणि प्राण (शक्ती) या स्वरूपात, नंतर तो कालतत्त्वरूपाने वर्ष, महिना, दिवस अशा संज्ञामध्ये रूपांतरित झाला. प्रजापति हा आता अन्नस्वरूपात वर्णिला आहे. स्त्री व पुरुष ज्या अन्नाचे सेवन करतात ते अन्नही प्रजापतिच व त्या अन्नापासून गतिमान असे निर्माण होणारे शुक्र व शोनित हेही प्रजापतिच. कारण अन्नापासून रेत उत्पन्न होते व ह्या वीर्याचे सिंचन स्त्री गर्भाशयात झाले की जीव उत्पन्न होतो. याप्रमाणे चंद्र व आदित्य यांचे मिथुन अन्न व प्राण, दक्षिणायन व उत्तरायण, कृष्ण पक्ष व शुक्ल पक्ष, रात्री आणि दिवस या क्रमाने परिणत झालेल्या अन्नापासून उत्पन्न झालेल्या वीर्याद्वारे ही प्रजा उत्पन्न होते.

## मंत्र पंधरावा

**तद्ये ह वै तत्प्रजापतिव्रतं चरन्तिते मिथुनमुत्पादयन्ते । तेषामेवैष ब्रह्मलोको येषां तपो ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् ।।१५।।**

### अन्वयार्थ

**तद्ये ह वै तठाजापतिव्रतं चरन्तिते मिथुनमुत्पादयन्ते** - म्हणून जे कोणी ते प्रजापतिव्रत आचरतात, ते जोडी उत्पन्न करतात. **येषाम् तपः ब्रह्मचर्यम् येषु सत्यम् प्रतिष्ठितम्** - ज्यांच्या ठिकाणी नियमित सद्वर्तन, इंद्रियनिग्रह, सत्यनिष्ठा, प्रतिष्ठित असतात, **तेषाम् एव एषः ब्रह्मलोकः** - त्यांनाच हा ब्रह्मलोक प्राप्त होतो.

### भावार्थ

म्हणून, अशा प्रकारे जे लोक 'प्रजापति'चा हा नियम पाळतात ते जोडी उत्पन्न करतात, ज्यांच्या ठिकाणी तप, ब्रह्मचर्य, सत्यनिष्ठा स्थित झाली आहे, अशा लोकांसाठीच केवळ, 'ब्रह्मलोक' आहे.

## मंत्र सोळावा

**तेषामसौ विरजो ब्रह्म लोको न येषु जिह्ममनृतं न माया चेति ।।१६।।**

### अन्वयार्थ

**येषु न जिह्मम् अनृतम् न माया च** - ज्यांच्या ठिकाणी कुटिलता, खोटेपणा आणि माया नाही; **तेषाम् असो विरजः ब्रह्मलोकः इति** - त्यांनाच तो निर्दोष ब्रह्मलोक प्राप्त होतो.

### भावार्थ

जो निर्दोष ब्रह्मलोक केवळ त्यांनाच प्राप्त होतो की, ज्यांच्यामध्ये कुटिलता किंवा ढोंग नाही.



## प्रजापति व्रताचे फळ

जे लोक प्रजापति व्रताचे एकनिष्ठतेने अनुष्ठान करतात व जे ऋतुकाली रात्री समागम करतात त्यांना मात्र उत्तम फलाची प्राप्ती होते. हे असे पुरुष मिथुनाची म्हणजे पुत्र व कन्या यांची उत्पत्ती करतात. असे हे मिथुनही प्रजापतिच आहे. अशा लोकांना चंद्रलोकाची प्राप्ती होते. ब्रह्मलोकाचा चंद्रलोक हा एक भाग आहे. अशा चंद्रलोकाला पितृयान मार्गाने जावे लागते. पण या मार्गाने जाणाऱ्यास कठोर नियमांचे पालनही करावे लागते. ईष्टापूर्तदान, तप, ब्रह्मचर्य आणि सत्यव्रत हे नियम अशा लोकांना एकनिष्ठतेने पाळावे लागतात.

जे लोक विकारवश न होता विरक्तवृत्तीने केवळ आत्मलाभासंबंधीच चिंतन करतात ते कोठेही असत्याचा किंवा कुटिलतेचा आश्रय करत नाहीत. अत्यंत निष्ठावान असल्यामुळे मित्यादंभ, दर्प याला बळी पडत नाहीत. अशा लोकांना शुद्ध ब्रह्मलोक मिळतो. या ब्रह्मलोकाचे लक्षण आदित्यात्मक आहे व या लोकाला उत्तरायण मार्गाने जावे लागते. हा मार्ग प्राणात्मक व शुद्ध आहे. चंद्रलोकाप्रमाणे वृद्धीक्षयादी असे स्वरूप नाही. मनुष्य प्रपंचात कोणत्याही स्थितीत असो, कोणत्याही आश्रमात असो; पण तो जर अशा शुद्ध आचरणाने राहत असेल तर अशा लोकांना शुद्ध असा आदित्य नामक हिरण्यगर्भलोक प्राप्त होतो. १५ व्या मंत्रात सकाम कर्म करणाऱ्यांना चंद्रलोक मिळतो व १६ व्या मंत्रात निष्काम कर्म करणाऱ्यांना आदित्यात्मक ब्रह्मलोक प्राप्त होतो हे सांगितले आहे.

याप्रमाणे पिप्पलाद ऋषींनी प्रजा कशा उत्पन्न होतात याचे उत्तर दिले आहे व त्याचबरोबर सकाम कर्म व निष्काम कर्म यांची फळे कोणती मिळतात हे सांगून या उत्तराची पूर्तता केली आहे.

**पहिला प्रश्न समाप्त.**



## दुसरा प्रश्न

### मंत्र पहिला

**अथ हैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ ।**
**भगवन्कत्येव देवाः प्रजां विधारयन्ते ।**
**कतर एतत्पकाशयन्ते कः पुनरेषां वरिष्ठ इति ।।१।।**

#### अन्वयार्थ

**अथ ह एनम् भार्गवः वैदर्भिः पप्रच्छ** – नंतर त्यांना 'विदर्भ' पुत्र भार्गवाने विचारले; **भगवन् रति देवाः एव प्रजां विधारयन्ते** – भगवान, एकूण किती देव प्राणिमात्रांचे धारण करतात? **कतरे एतत् प्रकाशयन्ते?** – त्यांच्यापैकी कोण ह्याला प्रकाशित करतात? **पुनः कः एषाम् वरिष्ठः इति** – शिवाय ह्यामध्ये कोणता सर्वश्रेष्ठ आहे?

#### भावार्थ

नंतर पिप्पलादाला, भार्गव वैदर्भिने प्रश्न विचारला, "भगवान, किती देव प्रजेचे धारण करतात? लोकांना प्रेरणा कोण देते? त्यातील वरिष्ठ कोण?"

## सृष्टीची विधारणा कोण करतो?

या सृष्टीतील प्रत्येक जीवाची, पदार्थाची विधारणा कोण करतो? असा हा दुसरा प्रश्न आहे. भृगूकुलोत्पन्न वैदर्भि पुत्र भार्गवाने हा दुसरा प्रश्न विचारला. या दुसऱ्या प्रश्नात तीन उपप्रश्न आहेत - १) शरीराचे धारण कोणते देव करतात किंवा हे सर्व देह कोणाच्या आधाराने चालतात? २) इंद्रियांना कोणते देव प्रकाशित करतात? ३) या सर्व देवांमध्ये सर्वश्रेष्ठ कोण? मनुष्याला ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये आहेत. ही सर्व इंद्रिये कर्म करण्यास स्वतःच्या सामर्थ्याने समर्थ नसतात. मग यांना प्रेरणा कोण देतो? त्यांना सामर्थ्य कोण



देतो? येथे सामर्थ्य देणारे देव हे कर्णरूपी आहेत. कुंभाराने घट तयार केला म्हणजे घट हे कार्य होते. ज्या चक्रावर मातीचा गोळा फिरवून घट तयार होतो ते चक्र घटरूप कार्याचे करण असते. कुंभार हे निमित्तकारण आणि माती हे घटाचे उपादान कारण आहे. याप्रमाणे कार्य, करण आणि कारण यांचा हा विचार आहे.

### मंत्र दुसरा

**तस्मै स होवाचाऽऽकाशो ह वा एष देवो।**
**वायुरग्निरापः पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ।**
**ते प्रकाश्याभिवदन्ति वयमेतद्बाणं अवष्टभ्य विधारयामः ।।२।।**

#### अन्वयार्थ

**स तस्मै उवाच** – (त्याला पिप्पलादाचार्यांनी उत्तर दिले); **आकाशः ह वै एषः देवः, वायुः, अग्निः, आपः पृथिवी, वाक् मनः चक्षुः श्रोत्र च** – आकाश हा देव आहे, तसेच वायू, अग्नी, जल, पृथ्वी हे देव आहेत व वाणी, मन, नेत्र, कर्ण हे देव आहेत. **ते प्रकाश्य 'वयं एतत् बाणं विधारयामः' अभिवदन्ति** – हे सर्व देव आपापले माहात्म्य प्रकट करतात. आणि त्यापैकी प्रत्येक जण अभिमानाने असे म्हणतो की, मी मात्र ह्या शरीरातील सर्व भागांस एकत्र करून त्यांचे धारण करतो.

#### भावार्थ

तेव्हा (आचार्य) त्याला म्हणाले, "आकाश हा तो देव आहे. वायू, अग्नी, जल, पृथ्वी, वाणी, अंतःकरण, डोळे व कान ते सर्व आपले सामर्थ्य आहे, असे सांगू लागतात. आम्हीच ह्या शरीराला आधार देऊन सांभाळतो."

## पंचमहाभूतांचे सामर्थ्य

आकाश, वायू, अग्नी, जल आणि पृथ्वी ही पंचमहाभूते शरीराची उत्पत्ती करणारी आरंभिक द्रव्ये समर्पित करतात. ही पंचमहाभूते या स्थूलदेहाला कारण आहेत. श्रुतीने या सर्वांना देवता हे उपपद देऊन त्यांच्या कार्याचे वर्णन केले आहे. हे शरीर आकाशादिकांच्या कार्यांनी व नेत्रादिकरणानी संघटित

झाले आहे. या देवता आपणच सर्व शरीराचे धारण करतो असे म्हणू लागल्या. प्रत्येक देवतेला असा अभिमान झाला की, मीच सर्व देवतांत श्रेष्ठ आहे. माझ्यामुळेच या शरीराला सामर्थ्य प्राप्त झाले आहे. प्रत्येक देवता आम्हीच या शरीराला आधार देऊन सांभाळतो, असे म्हणू लागल्या. वास्तविक आकाशादि पंचमहाभूते, वाणी प्रमुख कर्मेंद्रिये आणि नेत्रादि ज्ञानेंद्रिये ही तर जड आहेत. वास्तविक ही सर्व घटक द्रव्ये स्वबळावर शरीराचे धारण करू शकत नाहीत. त्यामुळे श्रेष्ठत्वाबद्दल चाललेल्या या वल्गना वृथा आहेत.

## मंत्र तिसरा

**तान्वरिष्ठः प्राण उवाच ।**
**मा मोहमापद्यथाऽहमेवैतत्पञ्चधाऽऽत्मानं**
**प्रविभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति तेऽश्रद्धान बभूवुः ।।३।।**

### अन्वयार्थ

**वरिष्ठः प्राणः तान् उवाच** - सर्वश्रेष्ठ प्राण त्यास म्हणाला, **मा मोहं आपद्यथ** - तुम्ही मोहात शिरू नका, **अहं एव एतत् बाणं अवष्टभ्य, पंचधा आत्मानं प्रविभज्य एतत् विधारयामि इति** - या शरीराचे अवष्टंभन करून - इकडेतिकडे जाऊ न देता एकत्र करून मी यांचे विधारण करतो. मी आपल्या स्वतःचे पाच विभाग करतो, आणि शरीराचे धारण करतो, **ते अश्रद्धानाः बभूवुः** - या प्राणाच्या बोलण्यावर कोणाचीही श्रद्धा बसली नाही.

### भावार्थ

त्या इंद्रियांना श्रेष्ठ देव प्राण म्हणाला, ''असे समजण्याचा वेडेपणा करू नका. कारण मीच स्वतःला पाच प्रकारे विभागून या शरीराला बळकटी आणतो.'' पण त्यांचा विश्वास बसला नाही.



## मंत्र चौथा

**सो भिमानादूर्ध्वमुत्क्रमत इव तस्मिन्नुत्क्रामत्यथेतरे**
**सर्व एवोत्क्रामन्ते तस्मिँश्च प्रतिष्ठमाने सर्व एव प्रातिष्ठन्ते ।**
**तद्यथा मक्षिका मधुकरराजानमुत्क्रामन्तं सर्वा अवोत्क्रामन्ते**
**तस्मिँश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रातिष्ठन्त एवं**
**वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ते प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति ।।४।।**

### अन्वयार्थ

**सः अभिमानात ऊर्ध्व उत्क्रमते इव** - अभिमानाने प्राण ऊर्ध्व दिशेला जाण्याचे मिष करता झाला, **अथ तस्मिन् उत्क्रामति इतरे सर्वे एव उत्क्रामन्ते, तस्मिन् च प्रतिष्ठमाने सर्वे एव प्रातिष्ठन्ते** - याप्रमाणे प्राणाने चलबिचल केल्याबरोबर शारीरिक धातूंची व इंद्रियावयवांची चलबिचल झाली आणि तो प्राण स्तब्ध (स्थिर) झाल्याबरोबर बाकीच्यासही स्तब्धता (स्थिरता) प्राप्त झाली, **तत् यथा मक्षिकाः** - ज्याप्रमाणे मधमाश्यांची स्थिती होते, **मधुकरराजान उत्क्रामन्त सर्वाः एव उत्क्रामन्ते तस्मिन च प्रतिष्ठामाने सर्वाः एव प्रातिष्ठन्ते** - मधुकरांचा राजा चालू लागला म्हणजे त्याच्या मागून सर्व मधमाश्या जाऊ लागतात किंवा तो बसला म्हणजे सर्व मधमाश्या त्याच्या सभोवती बसतात, **एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च** - याप्रमाणे वाणी, मन, नेत्र आणि कर्ण यांची स्थिती झाली, **ते प्रीताः प्राण स्तुन्वन्ति** - प्रसन्न होऊन ते सर्वजण प्राणाची स्तुती करते झाले.

### भावार्थ

तेव्हा प्राण शरीर सोडून निघाल्यासारखा झाला. प्राण बाहेर पडू लागताच डोळे वगैरे इंद्रिये निस्तेज झाली. मधाच्या पोळ्यातील राणी मक्षिका बाहेर पडताच सर्व मक्षिका बाहेर पडतात, तद्वत् प्राण बाहेर पडताच शरीराची स्थिती झाली. तेव्हा वाचा, मन, चक्षू, कर्ण या सर्वांनी प्राणाचे श्रेष्ठत्व मान्य केले आणि त्यांनी प्राणाचे खालीलप्रकारे स्तवन केले.

## प्राण माहात्म्य

देहामध्ये सर्वश्रेष्ठ कोण? हे सांगण्यासाठी पिप्पलाद ऋषींनी एक कथाच उभी केली. हे घडवणारी पंचमहाभूते, पंचज्ञानेंद्रिये आणि पंचकर्मेंद्रिये यांच्यामध्ये वितंडवाद सुरू झाला. जो तो म्हणू लागला की, या देहात मीच श्रेष्ठ आहे. त्या वेळी सर्वश्रेष्ठ प्राण त्या सर्वांना उद्देशून म्हणाला, ''बाबांनो, उगीच का भांडता? अशी आत्मप्रौढी न करता विवेक व बुद्धीने मला समजून घ्या. मीच वास्तविक या देहाचा आधार आहे. या देहाचे अवष्टंभन करून त्याचे धारण करण्यास मी एकटा मात्र समर्थ आहे. मी आपल्या स्वतःस पाच जागी विभागून पंचप्राण होतो आणि तुम्हा सगळ्यास एकत्र ठेवून तुमचे धारण करतो, हे माझे सामर्थ्य आहे.'' हे प्राणाचे बोलणे कोणत्याही इंद्रियास अथवा पंचमहाभूतास पटले नाही. प्राणाच्या बोलण्यावर त्यांची श्रद्धा बसली नाही. हे असे कसे होईल, असा प्रश्न त्यांच्या मनात उद्भवला. आपल्या बोलण्यावर या सर्व घटकांची श्रद्धा नाही असे पाहून उचित अभिमान असणाऱ्या प्राणाने त्या सर्वांना आपले माहात्म्य दाखविण्याचा संकल्प केला. त्याने आपल्यास राग आला आहे असे दाखवून स्वतंत्रतेने आपण बाहेर जातो असे दाखविले. तो बाहेर जाऊ लागल्याबरोबर बाकीच्या सर्व नेत्रादिकांचे ठायी असलेल्या प्राणास बाहेर जावे लागले. मुख्य प्राण स्थिर झाल्यावर बाकीचेही प्राण स्थिर झाले. या सर्व जड इंद्रियांवर मुख्य सत्ता प्राणाचीच आहे हे सांगण्यासाठी ऋषींनी येथे समर्पक दृष्टान्त दिला आहे. मधमाश्यांची मुख्य राणी जेव्हा मधाचे पोळे सोडून दूर जाते त्या वेळी सर्व मधमाश्या पोळे सोडून जातात आणि ती राणीमाशी तेथे परत येताच सर्व परत येतात. याप्रमाणे सर्व देहादि घटकांमध्ये प्राण हा सर्वांत श्रेष्ठ आहे याची खात्री झाल्याबरोबर सर्वांनी प्राणाभोवती गर्दी केली व सर्वजण मुक्तकंठाने प्राणाची स्तुती करू लागले.

### मंत्र पाचवा

**एषो ग्निस्तपत्येष सूर्य एष पर्जन्यो मघवानेष**
**वायुरेष पृथिवी पधिर्देवः सदसच्चामृतं च यत् ।।५।।**

### अन्वयार्थ

एषः अग्निः तपति, एषः सूर्यः, पर्जन्यः, एषः मघवान, एषः पृथिवी रयिः देवः, (रयिर्देवः?) यत सत् असत् च अमृतं - हा प्राण अग्नी होऊन दहन-कर्म करतो, सूर्य होऊन प्रकाशतो, पर्जन्य होऊन वृष्टी करतो, इंद्र होऊन पालन करतो, वायू होऊन स्वच्छता आणतो. हा पृथ्वी आहे, रयि आहे, सर्व जगताचा देव आहे, (किंवा रयिर्देव म्हणजे चंद्र आहे) हाच मूर्त वस्तू आहे, अमूर्त वस्तूही हाच व जे काय अमृत आहे, तोही मुख्य प्राणच आहे.

### भावार्थ

अग्नी' म्हणून 'प्राण' जळत असतो. 'सूर्य' म्हणून प्राण' प्रकाशतो, ढग' म्हणून 'प्राण' पाऊस पाडतो, इंद्र म्हणून तोच अधिकार चालवतो, तोच वायू, तोच पृथ्वी, तोच रयि (चंद्रदेवता) तोच आकारसहित आणि आकाररहित दोन्हीही आणि अविनाशीही आहे.

## प्राणाची विविध रूपे

पाचव्या मंत्रात प्राणाचे सामर्थ्य आणि सर्वव्यापित्व सांगितले आहे. हा प्राण अग्नी होऊन ज्वाला उत्पन्न करतो, सूर्यरूपाने तो साऱ्या सृष्टीला प्रकाश देतो, पर्जन्यरूपाने तो वृष्टी करतो. तो इंद्ररूपाने प्रजापालन करतो आणि असुरांचे निर्दालन करतो. तो वायूस्वरूपाने मेघास आणि तारकास वाहून नेतो. म्हणून मुख्य प्राण हा पृथ्वी आहे, रयि चंद्र सर्व जगताचा आधार व पोषक आहे तोच मूर्तामूर्त वस्तू आहे आणि तोच अमृत म्हणजे दैवीशक्तीला जिवंत ठेवणारे साधन आहे. पृथ्वी ही प्राणाचेच रूप असून सर्व जीवांना व अचेतन वस्तूंना तोच आधार आहे. इथे अन्नाला चंद्राची उपमा दिली असून ते अन्नही प्राणच आहे. या पृथ्वीतलावरील समस्त व्यक्त पदार्थ व अव्यक्त वा अमूर्त पदार्थ हे सर्व प्राणाचेच रूप आहेत. अग्नी, सूर्य, मेघ हे सर्व काही प्राणस्वरूपच आहेत.

### मंत्र सहावा

**अरा इव रथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितम्**
**ऋचो यजूँषि सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ।।६।।**

### अन्वयार्थ

रथनाभौ अराः इव प्राणे सर्वं प्रतिष्ठितं - गाडीच्या तुंब्यामध्ये

सर्व अऱ्या येऊन मिळतात, त्याप्रमाणे प्राणाच्या ठिकाणी यच्चयावत वस्तूस आधार मिळतो. **ऋचः यजूंषि, सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च** - ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, यज्ञ, क्षत्रिय आणि ब्राह्मणे हे सर्व प्राणाच्या आधाराने राहतात.

**भावार्थ**

ज्याप्रमाणे रथचक्राच्या नाभीमध्ये आऱ्या लावलेल्या असतात, त्याचप्रमाणे ऋक्, यजु, साम, यज्ञ व क्षत्रिय आणि ब्राह्मण ही सर्व प्राणाच्या ठिकाणी स्थित आहेत.

## सर्वांना प्राणच आधार आहे

गाडीच्या तुंब्यामध्ये सर्व अऱ्या येऊन मिळतात त्याप्रमाणे प्राणाच्या ठिकाणी यच्चयावत वस्तूस आधार मिळतो. त्या चक्राच्या नाभीमध्ये सर्व अऱ्या समर्पित होतात. त्याप्रमाणे श्रद्धादी नामपर्यंत असणाऱ्या सर्व वस्तू स्थितीकालात प्राणाच्या आधाराने राहतात. श्रद्धेच्या बळावर साधक जी साधना करतो त्या श्रद्धेला प्राणानेच गती मिळते. जगामध्ये जी नानारूपे व नामे अनुभवाला येतात त्या सर्वांचे अधिष्ठान प्राणावरच आहे. ऋक, यजु, साम इत्यादी तीन प्रकारचे मंत्र, त्यांनी साध्य होणारे यज्ञ, सर्वांचे पालन करणारे क्षत्रिय व यज्ञादी कर्मे करण्याचा अधिकार ज्यांना आहे ते ब्राह्मण या सर्वांचा अंतर्भाव मुख्य प्राणामध्ये होतो. म्हणून या जगात जे जे दिसते व ज्याचा ज्याचा अनुभव येतो, ते ते सर्व प्राणमय आहे. प्राणाशिवाय जग शून्य आहे. प्राण असल्यामुळेच अस्तित्व, गती व वर्धन आहे.

### मंत्र सातवा

**प्रजापतिश्चरसि गर्भे त्वमेव प्रतिजायसे । तुभ्यं**
**प्राण प्रजास्त्विमा बलिं हरन्ति यः प्राणैः प्रतितिष्ठसि ।।७।।**

**अन्वयार्थ**

**प्रजापतिः गर्भे चरसि, त्वं एव प्रतिजायसे, प्राण तुभ्यं इमाः प्रजाः बलिं हरन्तिः प्राणैः यः प्रतितिष्ठसि** - हे प्राण! तू प्रजापति असूनही गर्भामध्ये राहतोस आणि मातापित्यांचा प्रतिनिधी असतानाही पुन्हा उत्पन्न होतोस. ह्या सर्व प्रजा तुला करभार अर्पण करतात. तूच इतर प्राणांसह सर्व शरीर व्यापून राहतोस.

**भावार्थ**

हे प्राणा! तूच प्रजापतिरूपाने गर्भाशयात प्रवेश करून अर्भकाच्या रूपाने जन्म घेतोस. हे प्राणा! ही सर्व प्रजा तुलाच बली देतात, कारण तू सर्व इंद्रियांत स्थित असतोस.

## प्राणाची स्तुती

हे प्राण देवा! तू प्रजापति म्हणजे मातृपितृत्वाचा प्रतिनिधी आहेस. तूच गर्भामध्ये वास्तव्य करून पुनःपुन्हा उत्पन्न होतोस. तूच पित्याच्या गर्भामध्ये रेतरूपाने आणि मातेच्या गर्भामध्ये पुत्ररूपाने काही दिवस वास्तव्य करून पुढे त्यांच्यासारखेच रूप धारण करतोस आणि पुनःपुन्हा उत्पन्न होतोस. तुझे सर्व मातृत्व आणि सर्व पितृत्व पूर्वीच सिद्ध झाले असताही व तू एकच स्वरूप असताही शरीर आणि शरीरी असे रूप घेऊन या विश्वभर व्यापून राहतोस, म्हणून तू सर्वात्मा आहेस. अशा तऱ्हेने तू देह धारण केल्यानंतर तुझ्यासाठी देहांतर्गत सर्व इंद्रिये आपणास मिळणारे सर्व भोग तुलाच अर्पण करतात. नेत्रादि इंद्रियांसह सर्व शरीर व्यापून राहणारा जो प्राण त्या तुला सर्व प्रजा करभार देतात. तूच सर्व भोक्ता असल्यामुळे सर्व भोग्य पदार्थ तुला प्राप्त होतात. त्यामुळे तू सर्वश्रेष्ठ आहेस.

### मंत्र आठवा

**देवानामसि वह्नितमः पितृणां प्रथमा स्वधा ।**
**ऋषीणां चरितं सत्यमथर्वाङ्गिरसामसि ।।८।।**

**अन्वयार्थ**

**देवानां वह्नितमः असि, पितृणां प्रथमा स्वधा, ऋषीणां अथर्वगिरसां सत्यं चरितं असि** - तू सर्व देवांचा सर्वश्रेष्ठ हविर्वाहक-हवि वाहून नेणारा आहेस. पितरांचे जे नांदीप्रमुख श्राद्ध करतात त्यातील पहिला स्वधा तू आहेस. तसेच चक्षुरादि प्राणांचे व अंगिरस अथर्वणांचे सत्य चरित्र तू आहेस.

भावार्थ

तू देवतांचा श्रेष्ठ हव्यवाहक आहेस, पितरांना दिलेली पहिली आहुती नेणारा देखील तूच आहेस, अथर्व, अंगिरस आदी ऋषींकडून आचरले जाणारे सत्य तू आहेस.

## उदान वायूचा गौरव

'हे मुख्य प्राणा! तूच इंद्रादि सर्व देवतांस हवीर्भाग पोचविणारा श्रेष्ठ वाहक आहेस.' हवीर्भाग वाहतो म्हणून अग्नीला वन्ही असे नाव आहे. येथे वन्हितम् म्हणजे श्रेष्ठ अग्नी होय. तो अग्नीहून आपल्या जिभांनी देवतांना हवी पोहोचता करतो. सर्व इंद्रियांना प्राण हाच जीवनरस असून त्याच्यामुळेच विषयांचा रस घेता येतो. हाच प्राण जर नसेल तर इंद्रिये चैतन्यहीन होऊन जातात. प्राण हाच अथर्व आहे असे श्रुतीने म्हटले आहे. मुख्य प्राणाचे अंश असणारे व मुख्य प्राणाच्या अस्तित्वाने जिवंत राहणारे चक्षुरादि प्राण या सर्वांचा मुख्य आधार हा प्रधान प्राण आहे. सर्व इंद्रियाभिमानी देवतांस, इतरांस आणि इतर प्राणास जिवंत ठेवून आधार देणारा मुख्य प्राण आहे.

### मंत्र नववा

**इंद्रस्त्वं प्राण तेजसा रूद्रोऽसि परिरक्षिता**
**त्वमन्तरिक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ।।९।।**

अन्वयार्थ

**प्राण त्वं तेजसा इंद्रः, परिरक्षिता रूद्रः, त्वं अंतरिक्षे चरसु, त्वं ज्योतिषां पतिः सूर्यः** - हे प्राण, हे परमेश्वर, तू सामर्थ्याने सर्वसंहारकर्ता रुद्र आहेस, तसेच तूच संरक्षणकर्ता आहेस, अंतरिक्षामध्ये वावरणारा तेजस्पती सूर्यही तूच आहेस.

भावार्थ

हे प्राण! तूच इंद्र आहेस. (आपल्या) तेजामुळे तूच रुद्र असून सर्व बाजूंनी रक्षणकर्ताही आहेस. तूच ग्रहतारकांचा नेता सूर्य असून अंतरिक्षात संचार करतोस.



## प्राण गौरव

हे प्राण! तू इंद्र म्हणजे परमेश्वर आहेस, तू रुद्र स्वरूप घेऊन आपल्या पराक्रमाने जगताचा संहार करतोस आणि स्थितीकाली तूच सौम्यस्वरूप असे विष्णूस्वरूप धारण करून सर्व संकटांपासून जगाचे संरक्षण व पालनपोषण करतोस व अंतरिक्षामध्ये नित्य फिरत राहून कधी उदय पावतोस तर कधी अस्ताला जातोस. तूच सूर्य होऊन सर्व ग्रह नक्षत्रादि तारकांचा अधिपती होतोस. तूच सर्व सृष्टीचा प्रभव आणि प्रलय आहेस. विश्वातील सर्व पदार्थांना प्रकाश देणारा तूच आहेस. तूच वैश्वानर बनून चार प्रकारच्या अन्नांचे पचन करवितोस.

### मंत्र दहावा

**यदा त्वमभिवर्षस्यथेमाः प्राणते प्रजाः ।**
**आनन्दरूपास्तिष्ठन्ति कामायान्नं भविष्यतीति ।।१०।।**

अन्वयार्थ

**यदा त्वं अभिवर्षसि अथ इमाः प्रजाः प्राणते** - ज्या वेळी तू पर्जन्यरूपाने वृष्टी करतोस त्या वेळी या सर्व प्रजेस आपले व्यापार करता येतात; **कामाय अन्नं भविष्यति इति आनंदरूपाः तिष्ठन्ति** - आणि आपल्या इच्छेस तृप्त करील इतके अन्न आता उत्पन्न होईल, असे कळून त्यांना तुझ्या पर्जन्यवृष्टीने आनंद होतो.

भावार्थ

हे प्राण! तू जेव्हा पाऊस पाडतोस, तेव्हा प्रजा जगतात. पावसामुळे अन्न मिळते, म्हणून त्या आनंदी होतात.

## पर्जन्यरूपी प्राण हाच सर्वांचा आधार

ज्या वेळी पर्जन्य होऊन प्राण सर्व सृष्टीवर जलाचा वर्षाव करतो त्या वेळी अन्न निर्माण होऊन ते सर्व माणसांना व प्राणिमात्रांना, पशुपक्ष्यांना प्राप्त होते. यामुळेच ते आपआपले सर्व व्यवहार करू शकतात. या प्राणामुळेच प्राप्त झालेल्या अन्नाने ते पुष्ट होतात व आनंदीतही होतात. या प्राणाच्या आधारानेच

हे सर्व जगत असतात. त्यामुळे तोच सर्वांचा आधार आहे. आपल्या सर्व इच्छा तृप्त करील इतके अन्न आता उपलब्ध होईल असे समजून तुझ्या वृष्टीने सर्वांनाच आनंद होतो. मेघ, पर्जन्य, वायू, अग्नी ही सारी रूपे धारण करण्याचे सामर्थ्य प्राणाच्या अंगी आहे.

## मंत्र अकरावा

**व्रात्यस्त्वं प्राणैकऋषिरत्ता विश्वस्य सत्पतिः ।**
**वयमाद्यस्य दातारः पिता त्वं मातरिश्व नः ।।११।।**

### अन्वयार्थ

**त्वं व्रात्यः, हे प्राण एकऋषिः, अत्ता, विश्वस्य सत्पतिः** - हे संस्कारशून्य व्रात्या! तू एकऋषी नामक अग्नी आहेस; तू सर्व-भक्षक आहेस, तू सर्व विश्वाचा सत्पति आहेस; **वयं आद्यस्य दातारं** - आम्ही सर्वजण तुझे खाण्याचे अन्न पुरविणारे आहो; **हे मातरिश्व त्वं नः पिता** - हे मातरिश्वन्, तू आमचा पिता आहेस.

### भावार्थ

हे प्राणा! तू व्रात्य, एकऋषी नामक अग्नी, भक्षक आणि जगात मुख्य आहेस. आम्ही तुझी पूजा करणारे आहोत. तू प्राणवायू आहेस.

## प्राणच सर्वांचा आधार आहे

प्राण हा व्रात्य आहे असे येथे म्हटले आहे. ज्याला जातकर्म, नामकरण, उपनयन इत्यादी संस्कार झालेले नसतात त्याला व्रात्य म्हणतात. येथे प्राण हा एक ऋषीनामक अग्नी, भोक्ता व विश्वाचा पती आहे असे म्हटले आहे. प्राण हा सर्वांच्या अगोदर जन्माला आलेला आहे. परब्रह्माच्या संकल्पाने प्राण जन्मलेला असल्यामुळे त्याच्या जन्मापूर्वी संस्कार करावयास कोणीच नव्हते. जर पुरोहितच नाही तर संस्कार कोण करणार? म्हणून संस्काराच्या अभावी असल्यामुळे त्याला व्रात्य असे येथे म्हटले आहे. असा हा प्राण स्वभावतःच शुद्ध आहे. तोच मुख्य प्राण असून सर्व हवींचे (हवन केलेल्या वस्तूंचे) भक्षण करणारा अग्निरूप असा प्राण आहे. जगात जे जे आहे त्या सर्वांचा तो पिता आहे. आकाशात्मक जो प्राण तोच वायूचे स्वरूप आहे. सर्व जीव त्याच्याचमुळे



श्वासोच्छ्वास घेऊन जिवंत राहतात. श्वासात असणाऱ्या वायूला या मुख्य प्राणाचाच आधार असल्याने तो सर्वांचा जगतपिता आहे.

## मंत्र बारावा

**या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि ।**
**या च मनसि संतता शिवां तां कुरू मोत्क्रमीः ।।१२।।**

### अन्वयार्थ

**या ते तनूः वाचि, या श्रोत्रे, या च चक्षुषि, या च मनसि संतता प्रतिष्ठिता, तां शिवां तां कुरू, मा उत्क्रमीः** - वाणीमध्ये, कर्णामध्ये, नेत्रांमध्ये आणि मनामध्ये जे तुझे शरीर प्रतिष्ठित झाले आहे ते शरीर आमचे कल्याण करील असे कर. आमच्यापासून ते शरीर काढून घेऊ नकोस.

### भावार्थ

हे प्राणा! तू वाणी, कर्ण, डोळे व मन या इंदियात राहा. निघून जाऊ नकोस.

## प्राणाने आपली कृपा ठेवावी

वाणीमध्ये वक्तृत्वाचे सामर्थ्य, कर्णामध्ये श्रवण करण्याचे, नेत्रामध्ये दर्शन घेण्याचे, मनामध्ये सतत मनन करण्याचे जे सामर्थ्य आहे ते सर्व शरीर प्राणाच्या मालकीचे आहे. इंद्रियांचे व मनाचे जे जे म्हणून व्यापार होतात ते ते प्राणाच्या कोणत्यातरी रूपाच्या द्वारे होत असतात. कर्णात व्यानरूपाने, नेत्रात प्राणरूपाने, वाणीत अपानरूपाने, मनात समानरूपाने असतो. असे श्रुतीप्रमाण आहे. म्हणून इंद्रियादिकांची मुख्य प्राणास अशी प्रार्थना आहे की, त्याने योग्यरूपाने प्रत्येक इंद्रियात वास्तव्य करावे. त्याने शरीर सोडून जाऊ नये. इंद्रियांचे सर्व व्यापार मंगलकारी होतील असे त्याने पाहावे. तो बाहेर गेला तर सर्व व्यापार अमंगल होतात. असा हा मुख्य प्राण देहात असला तर इतर सर्व प्राण जिवंत राहून आपआपले व्यापार करीत असतात. हे प्राणा! तूच आमचे सर्वस्व असल्यामुळे आम्हाला जे जे मिळेल ते ते सर्व आम्ही तुला अर्पण करू.

## मंत्र तेरावा

**प्राणस्येदं वशो सर्वं त्रिदिवे यत्प्रतिष्ठितम् ।**
**मातेव पुत्रान् रक्षस्व श्रीश्च प्रज्ञां च विधेही न इति ।।१३।।**

### अन्वयार्थ

**यत् इदं सर्वं त्रिदिवे प्रतिष्ठितं प्राणस्य वशे** - जे काही तिसऱ्या लोकांत प्रतिष्ठित झाले आहे, ते सर्व मुख्य प्राणाला वश असते; **माता इव पुत्रान् रक्षस्व, नः, श्रीः च प्रज्ञां च, विधेहि** - माता पुत्राचे संरक्षण करते त्याप्रमाणे तू आमचे संरक्षण कर आणि आम्हास संपत्ती आणि बुद्धी दे; **इति** - याप्रमाणे इंद्रियादि प्राणांनी मुख्य प्राणाची स्तुती केली.

### भावार्थ

त्रैलोक्य प्राणाधीन आहे. आईप्रमाणे तू आमचे पालन कर. आम्हाला लक्ष्मी व बुद्धी दे.

## आईप्रमाणे प्राणाने आमचे संरक्षण करावे

या विश्वातील व स्वर्गलोकातील सारे काही या प्राणाच्याच आधीन आहे. या दोन्ही ठिकाणी उपभोग घेण्याच्या ज्या ज्या वस्तू आहेत त्या सर्वांचा स्वामी प्राण हा आहे. या अशा मुख्य प्राणाला इतर प्राण इंद्रिये व अवयव विनंती करतात की, आई मुलांचे जसे पालनपोषण करते व मुलाविषयी जागरूक असते, तसे प्राणाने आमचे संरक्षण करावे. तुझ्याच कृपेने आम्हाला सर्व प्रकारचा लाभ होऊ दे. तूच सर्वांचा प्रजापति, भोक्ता, साक्षी असल्यामुळे तूच सर्वात्मा आहेस. म्हणून या इहलोकातील आमचे जीवन मंगलमय होऊन कृतार्थ व्हावे अशी बुद्धी तू आम्हाला दे.

**दुसरा प्रश्न समाप्त.**





# तिसरा प्रश्न

## 'प्राणा'संबंधी व्यापक विचार

## मंत्र पहिला

**अथ हैनं कौसल्यश्चाश्वलायनः प्रपच्छ ।**
**भगवन्, कुत एष प्राणो जायते । कथमायात्यस्मिन् शरीरे ।**
**आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रतिष्ठते ।**
**केनोत्क्रमते कथं बाह्यमभिधत्ते । कथमध्यात्ममिति ।।१।।**

### अन्वयार्थ

**अथ ह एनं आश्वलायनः कौसल्यः च प्रपच्छ** - नंतर आचार्यास आश्वलायनकुलोत्पन्न कौसल्याने विचारले; **एषः प्राणः कुतः जायते** - हा प्राण कोठून उत्पन्न होतो? **कथं आयाति** - कसा प्रवेश होतो? **केन उत्क्रमते** - कोणत्या वृत्तीचा अवलंब करून तो बाहेर जातो.

### भावार्थ

नंतर आश्वलायन कौसल्य याने पिप्पलादाला प्रश्न विचारला, 'भगवन्, हा प्राण कसा निर्माण होतो? या शरीरात तो कसा येतो? शरीरात विभागून कसा राहतो? शरीरातून कसा बाहेर जातो? आणि बाह्य व अंतःस्थ स्वरूपाचे धारण कशा प्रकारे करतो?

## प्राणासंबंधीचे विविध प्रश्न

मागील दुसऱ्या प्रश्नात प्राणाचे श्रेष्ठत्व, उपभोगत्व व प्रजापतित्व इत्यादी गुणांचा ऊहापोह झाला. या तिसऱ्या प्रश्नात प्राणाच्या उत्पत्यादिकांची मीमांसा आली आहे. येथे प्राणाची उपासनाही जाणून घ्यावयाची आहे. चक्षु, वाणी, आकाश इत्यादी सर्वांनी प्राणाचे स्वरूप व त्याचे माहात्म्य समजून घेतले. हा

अभिप्राय मनात आणून कौसल्याने ऋषीस हे सर्व प्रश्न विचारले. 'कोणत्या कारणांपासून हा प्राण उत्पन्न होतो? असा हा प्राण उत्पन्न झाल्यावर कोणत्या स्वरूपाने, कोणत्या वृत्तीने किंवा प्रकाराने या आपल्या शरीरात प्रविष्ट होतो? कोणत्या निमित्ताने या प्राणाला शरीर ग्रहण करावे लागते? शरीरात प्रवेश झाल्यावर तो पाच प्रकारचा होऊन राहतो. त्याचे हे विभाजन झाल्यावर कोणत्या स्वरूपाने हा विद्यमान असतो?'

अधिभूत आणि अधिदैवत ज्या वस्तू आहेत त्या बाह्य वस्तू व मन, सुखदुःख इत्यादी अंतःस्थ वस्तूस अध्यात्म म्हणावे. या बाह्य व अंतःस्थ स्वरूपांचे धारण तो कसे करतो? असा हा प्राण मरणाच्या वेळी देह कसा सोडतो?

यात कौसल्याने प्राणाची उत्पत्ती, स्थिती, लय, त्याचे शरीरात येणे व शरीराच्या बाहेर जाणे अशा विस्तृत स्वरूपाचे प्रश्न विचारले.

### मंत्र दुसरा

**तस्मै स होवाच । अतिप्रश्नान् पृच्छसि ।**
**ब्रह्मिष्ठोऽसीति । तस्मात्तेऽहं ब्रवीमि ।।२।।**

**अन्वयार्थ**

**अतिप्रश्नान् पृच्छसि** - तू फार गूढ प्रश्न विचारतो आहेस; **ब्रह्मिष्ठः असि इति** - तू ब्रह्मवेत्ता आहेस.

**भावार्थ**

त्याला पिप्पलाद ऋषी म्हणाले, 'अत्यंत कठीण, गूढ, कूट प्रश्न तू विचारला आहेस. परंतु तू, ब्रह्मजिज्ञासू असल्याने तुला त्याचे मी उत्तर सांगतो.

## ब्रह्मनिष्ठ शिष्याची प्रशंसा

कौसल्याने प्रश्न विचारल्यावर पिप्पलाद ऋषींना आनंद झाला. प्राणस्वरूप समजायला अत्यंत कठीण आहे. केवळ ब्रह्मनिष्ठ असणाराच हे आत्मतत्त्व जाणू शकतो. कौसल्याचे ब्रह्माध्ययन व त्याची अपरब्रह्माची उपासना यथायोग्य असल्यामुळे अशा वैराग्यसंपन्न शिष्याला पिप्पलाद, संतुष्ट होऊन त्याच्या



प्रश्नांची उत्तरे देणार आहेत. असे अंतर्मुख होऊन, अधिकारप्राप्तीने प्रश्न विचारणारे जिज्ञासू अत्यंत दुर्मिळ आहेत.

### मंत्र तिसरा

**आत्मनः प्राणः**

**आत्मन एष प्राणो जायते । यथैषा पुरुषे छायैतस्मिन्नेतदाततम्**
**मनोकृतेनाऽयात्यस्मिन् शरीरे ।।३।।**

**अन्वयार्थ**

**एषः प्राणः आत्मनः जायते** - हा प्राण आत्मस्वरूपापासून उत्पन्न होतो; **यथा पुरुषे एषा छाया** - जशी पुरुषाच्या संबंधाने ही छाया उत्पन्न होते; **अस्मिन् शरीरे** - या शरीरात; **मनोकृतेन आयाति** - मनःसंकल्पाने प्रवेश करतो.

**भावार्थ**

हा प्राण आत्म्यापासून निर्माण होतो. माणसाच्या सावलीप्रमाणे मनुष्याच्या शरीरात प्राण व्यापलेला आहे. तो मनाच्या व्यापारामुळे (इच्छेने) शरीरात येतो.

## छायेसारखी प्राणाची उत्पत्ती मिथ्यारूप

प्राण आत्म्यापासून निर्माण झाला. अत्यंत श्रेष्ठ जो परम पुरुष, अक्षर आणि सत्यरूप ब्रह्म याच्यापासून प्राणाची उत्पत्ती झाली आहे. जसे मनुष्याच्या निमित्ताने ही छाया उत्पन्न होते त्याप्रमाणे ब्रह्माच्या निमित्ताने हे प्राणतत्त्व उत्पन्न होते. आत्म्याच्या अधिष्ठानावर ते जन्मते व त्याच्याचमुळे त्याचे अस्तित्व भासते. जशी छाया अनृतरूप, प्रतिबिंबरूप, मिथ्यारूप असते तसेच हा प्राण आभासात्मक, मिथ्यारूप भासतो व आत्म्याच्याच ठिकाणी समर्पित होतो.

केलेल्या कर्माच्या पाप-पुण्याच्या निमित्ताने व वासनारूपाने हा प्राण जडशरीरात प्रवेश करतो. छायेप्रमाणे हा प्राण आत्मछायारूप असतो. तो आत्म्याबरोबर येतो व वासनाकुडीचा क्षय होताच आत्मस्वरूपात लीन होतो. कर्म शरीर उत्पन्न करते व तेथे कर्मासक्तीने प्राणाची स्थापना होते. आत्मा

प्राण उत्पन्न करतो व तो प्राण मनःकृत संकल्पाने शरीरात शिरतो. पाप व पुण्यात्मक जशी वासना असेल त्याप्रमाणे त्याला तसे शरीर प्राप्त होते.

आत्म्याचे अधिष्ठान जरी लाभलेले असले तरी आत्मा हा अज, अक्षय व पाप-पुण्यातीत असल्याने त्याच्या ठिकाणी, प्राण या तत्त्वाचा आभासात्मक संबंध असतो.

### मंत्र चौथा

**यथा सम्राडेवाधिकृतान् विनियुङ्क्ते ।**
**एतान् ग्रामान् एतान् ग्रामान् अधितिष्ठस्वेति ।**
**एवमेवैष प्राण इतरान् प्राणान् पृथक्पृथगेव संनिधत्ते ।।४।।**

#### अन्वयार्थ

**यथा सम्राट एव** - ज्याप्रमाणे एखादा राजा; **एतान् गामान् एतान् ग्रामान् अधितिष्ठस्व इति विनियुङ्क्ते** - आपल्या हाताखालील अधिकाऱ्यास, तुम्ही 'या ग्रामाची व्यवस्था करा', 'तुम्ही त्या ग्रामाची व्यवस्था करा' अशी आज्ञा करतो.

#### भावार्थ

ज्याप्रमाणे राजा अधिकाऱ्यांची नेमणूक करून "तुम्ही त्या त्या गावांची व्यवस्था करा" अशी आज्ञा देतो. त्याप्रमाणे हा मुख्य प्राणच इतर प्राणांची वेगवेगळ्या ठिकाणी नेमणूक करतो.

## मुख्य प्राणाची कार्यपद्धती

लौकिक जगतात जसे एखादा राजा, आपल्या राज्यातील वेगवेगळ्या भागांचे अनुशासन करण्यासाठी, पात्रतेप्रमाणे त्या त्या अधिकाऱ्यांची नेमणूक करतो व कार्य करवून घेतो, त्याप्रमाणे हा मुख्य प्राण आपल्या नेत्रकर्णादि उपप्राणांस त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार निरनिराळ्या स्थानी ते ते विशिष्ट कर्म करण्यासाठी स्थापित करतो. नेत्रादिकात राहणारे प्राण हे मुख्य प्राणाच्या वृत्ती होत. या मुख्य प्राणाच्या सत्तेवर प्राणाचे इतर पाच प्रकार जरी वेगवेगळी कार्ये करीत असली, तरी हे सर्वजण एकत्वाने शरीराचा सांभाळ करतात.



### मंत्र पाचवा

**पायूपस्थेऽपानम् । चक्षुःश्रोत्रे मुखनासिकाभ्यां प्राणः स्वयं प्रातिष्ठते । मध्ये तु समानः । एष ह्येतद्धुतमन्नं समं नयति । तस्मादेताः सप्तार्चिषो भवन्ति ।।५।।**

#### अन्वयार्थ

**पायूपस्थे अपानं** - पायूपस्थांचे ठिकाणी अपानवायूची स्थापना;
**तस्मात् एताः सप्तार्चिषः** - याच्यापासून ह्या सप्तज्वाला उत्पन्न होतात.

#### भावार्थ

गुद व जननेंद्रियाच्या ठिकाणी अपान प्राण, तर नाक, कान व मुखनासिका यांच्या ठिकाणी प्राण स्वतः राहतो. मध्ये समान प्राण अन्न-पाणी पचवितो. त्या प्राणापासून सप्तज्वाला असलेला जठराग्नी निघतो.

## पाच प्राणांचे कार्य व सप्तज्वाला

या मंत्रात प्राण, अपान आणि समान् ह्या तीन प्राणविभागांचा विचार केला आहे.

अपानद्वाराची योजना पायूपस्थाच्या स्थानावर झाली आहे. पायूपस्थ म्हणजे दोन्ही मलद्वारे होत. हा अपानवायू मल-मूत्रादिकाचे अपनयन करतो. मल व मूत्राचे विसर्जन, जननेंद्रियांकडून होणारा वीर्यपात इत्यादी सर्व कामे कटिप्रदेशातील अपान करीत असतो.

आता मुख व नाक यांच्यापासून निघून मुख्य प्राण हा राजासारखा नेत्र-कर्णाच्या ठिकाणी आपली स्थापना करतो. प्राणवायूचे वास्तव्य नेत्र आणि कर्ण यात आहे. या प्राण आणि अपान वायूंच्या मध्ये समानवायूचे वास्तव्य आहे. हा वायू नाभीच्या ठिकाणी राहतो. याच्याकडे नेमलेले काम म्हणजे आपण जे काही अन्न खातो व पितो ती शरीरामधील अग्नीमध्ये प्रक्षिप्त करून तिला हा वायू एकरसत्त्व देतो. असा अन्नाचा व जलाचा एक रस झाल्यावर ते पोटातील अग्नीचे इंधन होऊन, त्या अग्नीपासून निघालेल्या ज्वाला हृदयप्रदेशापर्यंत येऊन पोहोचतात. ह्या ज्वाला सात असतात. त्या हृदयातून निघून मस्तक-प्रदेशापर्यंत जातात.

ह्या सप्तज्वाला प्राणाच्या द्वाराने दर्शन, श्रवण इत्यादी स्वरूपांनी ज्ञेय विषयांचे प्रकाशन करतात. मस्तकात सप्त छिद्रे आहेत. ह्या सप्तज्वालांच्या प्रकाशात त्या त्या इंद्रियांचे विषय प्रकाशित होतात. त्यामुळे ही ज्ञानेंद्रिये विषयोपभोग घेतात.

हृदय हे नाडीचे आगमनिरागमस्थान आहे. येथूनच सर्व नाड्या बाहेर निघून संपूर्ण शरीरभर पसरतात आणि पुन्हा येथेच विश्रांतीसाठी येतात. नंतर हा अन्नरस मस्तकापर्यंत जातो आणि येथे तो विषयसाधनरूपी ज्वालांनी सप्तद्वारातून बाहेर येतो.

## मंत्र सहावा

**हृदि ह्येष आत्मा । अत्रैतदेकशतं नाडीनां ।**
**तासां शतं शतमेकैकस्याः । द्वासप्ततिर्द्वासप्ततिः**
**प्रतिशाखानाडी सहस्राणि भवन्ति । आसु व्यानश्चरति ।।६।।**

### अन्वयार्थ

**हृदि हि एषः आत्मा** - ह्या आत्म्याचे वसतिस्थान हृदय आहे;
**अत्र एतत् नाडीनां एकशतं** - येथे एकशे एक प्रधान नाड्या आहेत;
**तासां शतं शतं एकैकस्यां** - त्या प्रत्येकीचे शंभर शंभर भेद आहेत;
**द्वासप्ततिः** - बहात्तर हजार (प्रभेद)

### भावार्थ

ह्या प्राणात्मा मुख्यतः हृदयात राहतो. ह्या हृदयाच्या ठिकाणी एकशे एक नाड्या आहेत. त्यातील प्रत्येक नाडीत शंभर शंभर सूक्ष्म नाड्या आहेत. त्या प्रत्येकीत बहात्तर सहस्र नाड्या आहेत. या नाड्यांत 'व्यान' नामक प्राण राहतो.

## 'व्यान' प्राणाचे स्वरूप

ह्या शरीररूपी रथामध्ये हृदयाकाशात आत्मारूपी मालक राहतो. ते हृदय मनस्वरूप असून कोट्यवधी नाड्यांच्या साहाय्याने व्यानासह सर्व शरीरात पसरले आहे.

ह्या आपल्या हृदयामध्ये एकशेएक प्रधान नाड्या आहेत. त्यापैकी प्रत्येकीला शंभर शंभर शाखानाड्या आहेत. पुन्हा या शाखानाड्यांपैकी प्रत्येकीचे बहात्तर



हजार प्रभेद आहेत. यास पतिशाखा नाडी असे म्हणतात. एकंदर सर्व मिळून ७२७२१०२०१ [१०१ x १०,१०० x ७२००० (प्रत्येक नाडीचे)] ही नाड्यांची संख्या झाली. या नाड्यांमध्ये जो वायू संचार करतो त्याला व्यान असे म्हणतात.

सूर्याचे किरण जसे संपूर्ण विश्वात संचारतात त्याप्रमाणे हृदयातून निघणाऱ्या व सर्व शरीरात संचार करणाऱ्या नाड्यांच्या साहाय्याने हा व्यान वायू सर्व शरीरभर संचार करीत असतो. व्यान हा सांध्यांची जी मर्मस्थाने आहेत तेथे त्याचे विशेषत्वाने अस्तित्व असते. तसेच हा प्राण आणि अपान या उभयतांचाही अभाव असता व्यानवृत्तीचा उद्भव होतो. हा वायू सर्वव्यापक आहे म्हणून याला व्यान म्हणतात. रक्तविभाजन करण्याच्या कामाप्रमाणेच या वायूकडे सर्व वीर्यशाली कर्मे घडवून आणण्याची व्यवस्था सोपविली आहे.

## मंत्र सातवा

**अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति ।**
**पापेन पापं । उभाभ्यामेव मनुष्यलोकम् ।।७।।**

### अन्वयार्थ

**अथ एकया उर्ध्वः** - आता एका नाडीने ऊर्ध्वगामी असणारा;
**उदानः** - उदानवायू; **उभाभ्यां एव मनुष्यलोकं, नयति** - पुण्य-पाप समान आहे, अशा पुरुषास मनुष्यलोकी नेतो.

### भावार्थ

यामध्ये एक ऊर्ध्व जाणारी नाडी आहे. तीमधून 'उदान' नामक प्राण पुण्यकर्मामुळे पुण्यलोकाला व पापकर्मामुळे पाप लोकाला घेऊन जातो. पण पाप-पुण्य समान असेल, तर प्राण मनुष्यलोकाला नेतो.

## 'उदान' प्राणाचे कार्य

मागील मंत्रात ज्या प्रमुख एकशे एक नाड्यांचा उल्लेख झाला त्यापैकी सुशुम्ना नावाची एक ऊर्ध्वगामी जाणारी नाडी आहे. तिच्या मार्गाने ऊर्ध्व जाणारा जो उदानवायू तो तळपायापासून मस्तकापर्यंत संचार करीत असतो.

स्वर्ग, नरक अथवा मनुष्यलोक या तिन्हींपैकी एका लोकास, जीवाला पोचवण्याचे कार्य हा उदानवायू करतो.

जे पुरुष शास्त्रविहित अशी पुण्यकर्मे करतात, त्यास हा वायू देवादिकांच्या व पुण्यात्म्यांच्या वसतीचे स्थान जो स्वर्ग त्यात नेऊन पोचविण्याचे काम हा वायू करतो. जो पुरुष शास्त्रनिषिद्ध अशी कर्मे, कोणताही विधिनिषेध न बाळगता, मनाला येईल तसे करतो, अशा पाशवी वृत्तीच्या लोकांना हा वायू नरकाची वाट दाखवितो. असे पुरुष पशुपक्ष्यादिकांच्या योनीस जाऊन आपल्या वासनांची पूर्तता करून घेतात. पण ज्या पुरुषांचे पाप-पुण्य समसमान आहे, त्यास हा वायू जन्ममरणाचे फेरे जेथे आहेत अशा मृत्युलोकी घेऊन जातो. अशांना पुन्हा मनुष्यजन्म प्राप्त होतो.

या मंत्रात उदानवायूचे कार्य विशद केले आहे.

### मंत्र आठवा

**आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदयति ।**
**एष ह्येनं चाक्षुषं प्राणमनुगृह्णानः ।**
**पृथिव्यां या देवता सैषा पुरुषस्यापानमवष्टभ्य ।**
**अन्तरा यदाकाशः स समानः । वायुर्व्यानः ।।८।।**

#### अन्वयार्थ

**आदित्यः ह वै बाह्य प्राणः उदयति** - सूर्य हा बाह्य प्राण आहे आणि तो नित्य उदय पावतो; **एषः हि एनं चाक्षुषं प्राणं अनुगृह्णानः** - हा सूर्य आपल्या नेत्रसंबंधी प्राणावर अनुग्रह करतो; **वायुः व्यानः** - सर्वव्यापी वायुदेवता व्यानाला उपकारक होते.

#### भावार्थ

आदित्यरूपाने बाह्य प्राण उगवतो. तो ह्या चक्षुस्य प्राणावर अनुग्रह करीतच उदयास येतो. पृथ्वीवरील जी देवता आहे, तीच पुरुषाचा अपान प्राण होय. आकाशामध्ये जो आहे, तो समान प्राण होय. तो व्यानाशी जोडला आहे.



## प्राणांचे आधिदैविक व आधिभौतिक स्वरूप

सूर्य हाच बाह्य प्राण आहे. हा अधिदैवत जो प्राण आहे तोच सर्वप्रकाशक सूर्य होय. पिंडी ते ब्रह्मांडी या न्यायाने प्राणही दोन्ही ठिकाणी समान व्यवहार करतो. सूर्य हा ब्रह्मांडातील प्राण आहे. हा उदय पावला असता, आपल्या नेत्रामध्ये उत्पन्न होणारा जो आध्यात्मिक प्राणवायू, त्यालाही ही सूर्यदेवता साह्य करते. नेत्राला रूप पाहण्याचे जे सामर्थ्य आहे, ते या सूर्याच्या अनुग्रहाने प्राप्त झाले आहे.

तसेच पृथ्वीची अभिमानीनी जी अग्निदेवता देहातील अपानाशी एकरूप होऊन असते. या अग्निदेवतेच्या कृपेमुळेच जीव व जडादि सृष्टी स्थिर राहते. त्यांची एकरूपता हीच गुरुत्वाकर्षण नावाची शक्ती असून, त्यामुळेच सर्व पदार्थ स्थिर राहतात. गुरुत्वाकर्षणातील प्राण हाच देहातील अपान असून त्याच्या शक्तीमुळेच पृथ्वीवरील सर्व जड व जीव स्थिर राहतात.

तसेच स्वर्ग व पृथ्वी यांच्यामध्ये जे अवकाश आहे, तेथे संचार करणाऱ्या वायूला 'आकाश' असे म्हणतात. त्याचप्रमाणे पिंडातही प्राण व अपानाच्या मध्ये समान असतो. तो समान नाभिप्रदेशात राहून, प्राण व अपानांच्या मध्ये फिरून देहातील पेशींचे पोषण करतो.

अंतरिक्षात जो वायू असतो तोच देहामध्ये व्यान असून अन्नरस वाहून देहाचे तो रक्षण करतो.

या मंत्रात जीवाच्या देहात व इंद्रियात जो अध्यात्मप्राण असतो, त्याच्यावर विश्वप्राणाच्या देवता कसा अनुग्रह करतात हे सांगितले. विश्वप्राण हे देहस्थप्राणाची कशी स्वरूपे आहेत हे या मंत्रावरून समजते आणि प्राणरूपी तत्त्व सर्वव्यापी व एकरस आहे असा निश्चय होतो. प्राण स्वरूपतः एकच आहे, पण उपाधींच्या भिन्नतेमुळे तो निराळा वाटतो.

### मंत्र नववा

**तेजो ह वा उदानः । तस्मादुपशान्ततेजाः ।**
**पुनर्भवमिन्द्रियैर्मनसि संपद्यमानैः ।।९।।**

#### अन्वयार्थ

**तेजः ह वै उदानः** - तेज हे द्रव्य उदानवायूवर अनुग्रह करते; **उपशान्ततेजाः** - तेजाचा नाश झाला म्हणजे; **मनसि** - मनामध्ये.

भावार्थ

तेज म्हणजे उदान. ते नष्ट झाले म्हणजे मानव मरणोन्मुख होतो. तो मनात लीन झालेल्या इंद्रियांसह पुन्हा जन्माला येतो. (पुनर्जन्म घेतो.)

## तेजस्वरूप उदान

जे सर्वसामान्य बाह्यतेज आहे ते स्वतेजाने जीवाच्या शरीरात असणाऱ्या उदान वायूचे उपकारक होते. बाह्य तेजाचा अनुग्रह झाल्यामुळे तेजःस्वभावी उत्क्रांतिकर्ता उदानवायू आहे. तो स्वतःच तेजस्वभावी आहे. बाह्य तेजाचा आश्रय असला म्हणजे उदानवायू स्वकार्य-समर्थ असतो. आणि हा आश्रय संपला म्हणजे या उदानवायूचे सामर्थ्य नष्ट होते. असे झाले म्हणजे तो जीव मुमूर्षु (मरणासन्न) होतो.

जेव्हा तो तेजस्वरूप असतो तेव्हा शरीर उष्ण भासते. ही उष्णता उदरामध्ये असणाऱ्या अग्नीच्या सामर्थ्याने प्राप्त झालेली असते. मरणोन्मुख पुरुषाची सर्व इंद्रिये मनामध्ये लीन होतात. शरीराची उष्णता कमी कमी होऊन सर्व प्राण एकाच प्राणाच्या ठिकाणी गोळा होतात. इंद्रियांच्या इच्छा वासनारूप होऊन मृत्यूच्या वेळी उदानाबरोबर जातात. ज्या जीवाच्या मनाचे संकल्प-विकल्प संपले नाहीत त्याची सर्व इंद्रिये मनामध्ये प्रवेश करतात आणि असा हा बनलेला लिंगदेह दुसऱ्या शरीरात प्रवेश करतो.

जोपर्यंत वासना आणि संकल्प जिवंत आहेत, तोपर्यंत अज्ञान संपत नाही व तोपर्यंत जीवाची जन्म-मरण यात्राही संपत नाही.

प्राणाचा अनुग्रह नाहीसा झाला की जीवाचे आयुष्य संपते व पुनर्जन्माची यात्रा सुरू होते.

### मंत्र दहावा

**यच्चित्तस्तेनैष प्राणमायाति । प्राणस्तेजसा युक्तः सहात्मना यथासङ्कल्पितं लोकंनयति ।।१०।।**

अन्वयार्थ

**यच्चित्त तेन एषः प्राणं आयाति** - ज्याचे चिंतन रात्रंदिवस असते, त्या संकल्पासह हा मुख्य प्राणाकडे जातो; **यथा संकल्पितं** - जसा संकल्प, ध्यास, इच्छा केलेल्या आहेत अशा; **लोकं नयति** - लोकाप्रत नेतो.



भावार्थ

ज्या विचाराने, संकल्पाने, वासनेने चित्त असेल, त्याच संकल्पाने जीव पुनर्जन्म घेतो. मुख्य प्राण उदानवायूसह जीवाला, त्या संकल्पित लोकांप्रत घेऊन जातो, जेथे त्याला त्या वासनांची पूर्तता, उपभोग मिळेल.

## मृत्यूसमयी जशी वासना तसा जन्म

मरणसमयी जीवाच्या ठिकाणी ज्या शुभाशुभ वासना असतात त्याप्रमाणे त्या वासनापूर्ततेसाठी त्या त्या लोकात पुन्हा जन्म घ्यावा लागतो. 'अन्ते या मतिः सा गतीः' ज्याचा ध्यास लागलेला आहे त्याचीच प्राप्ती पुन्हा होते. आयुष्यभर ज्या कामना केलेल्या असतात त्या अंतःकरणात वासनारूपाने राहतात. मृत्यूच्या वेळी हेच वासना समुदाय पुन्हा उफाळून वर येतात. ज्याची ओढ असते, तेच संस्काररूपाने मरणकाळी उभे ठाकते.

मृत्यूच्या समयी मी रामाचे नाम घेईन व ऊर्ध्वगतीला आपसुक जाईन असे, ज्यांनी मनसुबे केलेले असतात ते मृत्यूसमयी व्यर्थ ठरतात. कारण मृत्यूसमयी सर्व इंद्रिये आपापले व्यवहार आपणहून करण्यास सर्वस्वी सक्षम नसतात. अशा वेळी मन व बुद्धीदेखील शुद्ध, बुद्ध अवस्थेत नसतात. त्या वेळी वर्षानुवर्षे अंतःकरणात संस्काररूपाने राहिलेल्या वासनाच बाहेर उसळी मारून येतात. ज्या भोगांची दृढ वासना मृत्यूसमयी अंतःकरणात स्थिर झालेली असते, त्यांना घेऊन, हा मुख्य प्राण उदानवृत्तीसह त्या त्या लोकाला, जीवाला पोहोचवितो.

मरणसमयीच्या वासनेप्रमाणे जीवाला दुसरा जन्म प्राप्त होतो.

### मंत्र अकरावा

**य एवं विद्वान् प्राणं वेद ।**
**न हास्य प्रजा हीयते अमृतो भवति । तदेष श्लोकः ।।११।।**

अन्वयार्थ

**यः प्राणं वेद** - ज्याला प्राणस्वरूपाचे ज्ञान झाले आहे; **ह अस्य प्रजा न हीयते** - त्याचा वंश (मुलेबाळे) केव्हाही नष्ट होत नाही;

**अमृतः भवति** - तो अमर होतो; **तत् एषः श्लोकः** - यासंबंधाने हा श्लोक (मंत्र) आहे तो असा.

**भावार्थ**

जो विद्वान अशा प्रकारे प्राणविचार जाणतो, त्याचा वंश केव्हाही नष्ट होत नाही. तो अमर होतो. या अर्थाचा पुढील मंत्र (श्लोक) आहे.

## प्राणस्वरूप जाणणारा अमर होतो

ज्या कोणा ज्ञानी पुरुषाला, या तिसऱ्या प्रश्नाच्या मीमांसेत सांगितलेले प्राणस्वरूपाचे यथार्थ ज्ञान झाले त्याला इहलोकीसुद्धा काय फळ मिळते, ते श्रुतीने या अकराव्या मंत्रात सांगितले आहे.

आत्म्यापासून प्राण उत्पन्न होतो, मनाच्या संकल्पानुसार केलेल्या धर्माधर्मामुळे देहप्राप्ती होते. मुख्य प्राणवायू आपल्यास पाच विभागांमध्ये विभागून प्राणापानादि पंचप्राणात्मक होतो, पंचमहाभूते आपापल्या दैवतासह या पंचप्राणावर अनुग्रह करतात... अशा प्रकारचे प्राणाचे स्वरूप समजून घेऊन जे लोक ज्ञानी होतात त्यांच्या वंशाचा नाश केव्हाही होत नाही.

अशा विद्वानाला अमरत्व प्राप्त होते. देहपातानंतर तो प्राण सायुज्यता प्राप्त करून घेतो. असा पुरुष ह्या जगातसुद्धा 'विचरे विश्व होऊनि विश्वामाजी' अशा पद्धतीने जगतो.

अशा अर्थाचे समर्थन करणारा एक मंत्र वेदांत आला आहे. तो पुढील मंत्रात सांगितला आहे.

## मंत्र बारावा

**उत्पत्तिमायतिं स्थानं विभुत्वं चैव पञ्चधा ।**
**अध्यात्मं चैव प्राणस्य विज्ञायामृतमश्नुते ।**
**विज्ञायामृतमश्नुते इति ।।१२।।**

**अन्वयार्थ**

**प्राणस्य उत्पत्तिं, आयतिं, स्थानं विभूत्वं, पंचधा** - प्राणाची उत्पत्ती, त्याची गती, त्याचे स्थान, त्याचे सर्वव्यापित्व व सर्वश्रेष्ठत्व त्याची पंचप्रकारक स्थापना; **विज्ञाय** - जाणून घेऊन; **अमृतं अश्नुते** - अमृततत्त्वाचा उपभोग घेतो.



**भावार्थ**

प्राणाची उत्पत्ती, गती, स्थान, व्यापकत्व व बाह्य देहसंबंधी अशा पाच प्रकारची प्राणाची स्थिती जाणून मनुष्य अमृततत्त्व, अमरत्व प्राप्त करून घेतो.

## प्राणस्वरूप जाणल्याने मिळणारे वेदकथित फळ

परमात्म्यापासून झालेली प्राणाची उत्पत्ती, मनाच्या संकल्पानुसार व इंद्रियांच्या कर्मानुसार प्राणाचे होणारे आगमन व त्याचे शरीरातील वास्तव्य, पायूपस्थादि स्थानातील त्याचे विभुत्व व स्वामित्व, त्याचे स्वतंत्रत्व, प्राणापानादि पंच प्रकारानी मुख्य प्राणशक्तीचे विभाजन आणि स्थापना, आदित्यादि पंचमहाभूतांच्या दैवी अनुग्रहाने होणारी व नेत्रादिरूपाने पंचज्ञानेंद्रियांची प्राणात्मक अध्यात्म स्थिती या सर्वांचे यथार्थ ज्ञान झाले असता तो पुरुष अमृततत्त्व प्राप्तीचा अधिकारी होतो.

अशा प्रकारे प्राणाचे यथार्थ स्वरूप जाणून, त्याचे निरंतर ध्यान करणारा पुरुष, मुख्य प्राणास असणारे अमृततत्त्व प्राप्त करून घेतो.

**तिसरा प्रश्न समाप्त.**



# चौथा प्रश्न

## मंत्र पहिला

**अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः प्रपच्छ ।**
**भगवन्नेतस्मिन् पुरुषे कानि स्वपन्ति ।**
**कान्यस्मिञ्जाग्रति कतर एषः देवः स्वप्नान् पश्यति ।**
**कस्यैतत्सुखं भवति । कस्मिन्नु सर्वे संप्रतिष्ठिता भवन्तीति ।।१।।**

### अन्वयार्थ

**अथ हैनं (ह एनं) सौर्यायाणी गार्ग्यः प्रपच्छ** - नंतर (सूर्यकुळातील) गार्ग्य सौर्यायणीने प्रश्न केला; **एतस्मिन् पुरुषे** - या पुरुषाचे ठिकाणी; **कानि स्वपन्ति** - कोणकोण झोपी जातात? **कानि जाग्रति** - कोणकोण जागे असतात? **कास्य एतत् सुखं भवति** - कोणाला सुख मिळते?

### भावार्थ

नंतर त्या पिप्पलाद ऋषींना गार्ग्य सौर्यायणीने प्रश्न केला, "हे भगवन्, ह्या पुरुषामध्ये (देहामध्ये) कोणती इंद्रिये कार्य करीत नाहीत? (कोण झोपतात?) कोणती इंद्रिये जागतात? (कार्य करतात?) कोण देव यातील स्वप्ने पाहतो? ह्या सुखाचा अनुभव कोणाला येतो? आणि ही सर्व कोणाच्या अधिष्ठानावर आहेत?

## निद्रा व स्वप्न यांचे सुख कोणाला मिळते?

या मंत्रात एकूण पाच प्रश्न विचारले आहेत- १) पुरुषाला स्वप्ने पडत असता किंवा तो निद्रेत असता कोणती इंद्रिये झोपी जातात? २) कोणती जागृत असतात? ३) स्वप्नाचा भोक्ता कोण? ४) निद्रेमध्ये जे सुख उत्पन्न होते त्याचा भोक्ता कोण? आणि ५) गाढ निद्रा लागली असता ही सर्व इंद्रिये कोठे जाऊन लीन होतात?

असे हे प्रश्न पिप्पलाद ऋषींना विचारले. हा चौथा प्रश्न आहे. पहिल्या तीन प्रश्नांत चराचरात्मक जागृतीच्या व्यवहाराचा विचार झाला. प्रजा कशी



निर्माण होते? देहाचा सांभाळ कोण करते? व देहात प्राण कोठून येतात? अशा प्रश्नांची उत्तरे पिप्पलाद ऋषींनी दिली. हे सर्व अपराविद्येच्या कक्षेत येते. ज्या विद्येत परमतत्त्वाचा विचार होत नाही व केवळ अनित्य, सांसारिक, दृश्य विषयांचा विचार होतो ती विद्या अपरा.

पण या प्रश्नात व उर्वरित प्रश्नात कमी-जास्त प्रमाणात परब्रह्मविषयाचा विचार केला आहे. म्हणून ती पराविद्या. आतापर्यंत ज्या प्रश्नांचा ऊहापोह झाला त्यात साध्य-साधन भाव शिल्लक असून तो मन व बुद्धीच्या ठिकाणी असतो. परंतु पराविद्येचा मार्ग साध्य व साधनरूप नाही. इंद्रिये, प्राण व बुद्धी यांना ब्रह्म जाणता येत नाही. कारण ते अगोचर व निर्गुण आहे. हे परब्रह्म कार्य-कारण शून्य, दशेंद्रियागोचर, सुखरूप, अविकार्य, अविकारी, अक्षर, त्रिकालाबाधित, एकरस, सच्चिदानंदघन, अमर असे तत्त्व आहे.

असे तत्त्व जाणण्यासाठी ही पराविद्या असून ती जाणण्यासाठी गार्ग्य पिप्पलादास प्रश्न विचारत आहेत. जागृती, स्वप्न व सुशुप्ती ह्या तीन अवस्थांचे यथार्थ स्वरूप जाणण्यासाठी हा प्रश्न आहे. प्रदीप्त झालेल्या अग्नीपासून जशा लाखो ठिणग्या उत्पन्न होतात, या सर्व ठिणग्यांमध्ये केवळ एकच अग्नी असतो, त्याप्रमाणे अक्षर परब्रह्मापासून सर्व दृश्य व कल्पनीय वस्तू होतात व परब्रह्मस्वरूपातच लयाला जातात. "मी एकच असून मीच नाना व्हावे" असे परब्रह्माला वाटल्यानंतरच जड व जीव सृष्टीची निर्मिती झाली. ह्या चराचरात तोच भगवंत भरून उरला आहे.

अशा या परब्रह्माचे लक्षण काय? इतर वस्तू तेथून उत्पन्न होऊन तेथेच लयाला कशा जातात, त्या इतर वस्तू कोणत्या या प्रश्नांची उत्तरे गार्ग्यास हवी आहेत.

जागृतकाळी ज्या पदार्थाचे दर्शन होते ते पदार्थ अंतःशरीरामध्ये झोपी गेलेल्या पुरुषाने पाहणे याचे नाव स्वप्न. अशा स्वप्नाची उत्पत्ती कशी होते? या स्वप्नाचा साक्षी कोण?

जागृतावस्थेत जशी इंद्रिये एकवट झालेली असतात, तशीच ती निद्रेमध्येसुद्धा कोठेतरी लीन झाली पाहिजेत. यांचा लय सुशुप्ती अवस्थेमध्ये कोठे होतो? हे गार्ग्यांना जाणून घ्यावयाचे आहे. यासाठी त्यांनी वरील पाच प्रश्न पिप्पलाद ऋषींना विचारले.

## मंत्र दुसरा

**तस्मै स होवाच यथा गार्ग्य मरीचयोऽर्कस्यास्तं गच्छतः सर्वा एतस्मिंस्तेजोमण्डल एकीभवन्ति । ताः पुनः पुनरुदयतः प्रचरन्त्येवं ह वै तत्सर्वं परे देवेमनस्येकीभवति । तेन तर्ह्येष पुरुषो न श्रृणोति, न पश्यति, न जिघ्रति, न रसयते, न स्पृशते, नाभिवदते, नादत्ते नाऽनन्दयते न विसृजते नेयायते स्वपितीत्याचक्षते ।।२।।**

### अन्वयार्थ

**यथा अस्तं गच्छतः** - ज्याप्रमाणे अस्तास जाणाऱ्या; **अर्कस्य** - सूर्याचे; **तेजोमंडले** - तेजोमंडळात; **तस्य उदयतः** - त्याचा उदय झाला असता; **प्रचरन्ति** - प्रकाशित होतात; **मनसि** - मनात; **तेन तर्हि एषः पुरुषः न शृणोति** - म्हणून हा पुरुष ऐकत नाही.

### भावार्थ

तेव्हा ते आचार्य म्हणाले, 'हे गार्ग्य, ज्याप्रमाणे सूर्य मावळल्यानंतर त्याचे सर्व किरण त्याच्याच तेजोमंडळाशी एकरूप होतात व तो उगवल्यानंतर पुन्हा फाकतात, त्याप्रमाणे ते सर्व (इंद्रियरूप) परमदेव मनाच्या ठिकाणी एकरूप होतात. म्हणून त्या काळी (निद्रेच्या वेळी) तो पुरुष ऐकत नाही, पाहत नाही, वास घेत नाही, चव घेत नाही, स्पर्श करीत नाही, बोलत नाही, काही घेत नाही, आनंदित होत नाही, मळ विसर्जित करीत नाही व काहीच कार्य करीत नाही, त्या वेळी तो निद्रिस्त आहे, असे म्हटले जाते.'

## निद्रेच्या वेळी सर्व इंद्रिये मनात लय पावतात

सूर्य अस्ताला जाताना ज्याप्रमाणे सर्व किरण त्यामध्ये लोप पावतात आणि सूर्याचा उदय झाला म्हणजे पुन्हा प्रकट होतात, त्याप्रमाणे इंद्रियांच्या सर्व शक्ती निद्रेच्या प्रसंगी मनामध्ये लोप पावतात. सर्व पंचज्ञानेंद्रिये व पंच कर्मेंद्रियांना मन आपल्या ठिकाणी स्थिर करते. मन इंद्रियांचा स्वामी असून ते मनच लय पावल्यानंतर इंद्रियेही लय पावतात. अशा वेळी इंद्रियांना ऐकू येत



नाही, दिसत नाही, वास येत नाही, स्पर्श कळत नाही, बोलता येत नाही... कोणतीच क्रिया करता येत नाही. ही सर्व इंद्रिये व्यापारशून्य असतात. मनाच्या ठिकाणी लीन झाल्यामुळे ही सर्व इंद्रिये शांत व स्तब्ध असतात.

इंद्रिये आपापले व्यापार सोडून मनाच्या ठिकाणी एकत्र राहतात. या अर्थाने ते लय पावतात. इंद्रिये आपला व्यापार सोडतात पण आपले गुणधर्म टाकीत नाहीत. जेव्हा जीव जागृतावस्थेत येतो तेव्हा मनही परत जागे होते व इंद्रिये आपल्या स्वभावासह पुनश्च कार्यरत होतात.

## मंत्र तिसरा

**प्राणाग्नय एवैतस्मिन्पुरे जाग्रति । गार्हपत्यो ह वा एषोऽपानः। व्यानोऽन्वाहार्यपचनः । यद्गार्हपत्यात्प्रणीयते प्रणयनात् आहवनीयः प्राणः ।।३।।**

### अन्वयार्थ

**प्राणाग्नयः** - प्राणाग्नि; **अस्मिन् पुरे** - ह्या देहामध्ये; **जागृति** - जागा राहतो; **गार्हपत्य** - गार्हपत्य अग्नी; **अन्वाहार्यपचनः** - दाक्षिणाग्नि

### भावार्थ

तेव्हा या शरीरात फक्त प्राणाग्नि जागृत असतात. अपान प्राण हा गार्हपत्य अग्नि; व्यान हा अन्वाहार्यपचन अग्नि. तो गार्हपत्यापासून आणल्यामुळे त्याला 'प्राणायन्' म्हणतात. तोच 'आहवनीय' प्राण होय.

## निद्रेच्या वेळी प्राण जागा असतो

प्राण मात्र निद्रेच्या वेळी सदा जागा असतो. शरीरधारणेचे आपले कार्य तो नेहमी करीत असतो. मन व इंद्रिये जरी निद्राधीन झालेली असली तरी प्राणाग्नी जागृत असतो. कर्णनेत्रादि सर्व इंद्रिये स्तब्ध, शांत झाली असता या नऊ द्वारे असणाऱ्या देहात प्राणापानादि पंच वायू अग्नीसारखे नित्य जागृत असतात.

ह्या प्राणास अग्नीची उपमा दिली आहे. अग्निहोत्राचा विधी चालला असता गार्हपत्य अग्नीपासून आहवनीय अग्नीला नेतात. म्हणून त्याला आहवनीय अग्नी म्हणतात. गार्हपत्य अग्नी गृहस्थाच्या घरी नित्य असतो. अग्निहोत्रकाली मात्र आहवनीय अग्नीची स्थापना होते. त्या वेळी तो अग्नी गार्हपत्य अग्नीपासून

नेत असतात व म्हणून त्याला आहवनीय अग्नी म्हणतात. व्यान वायू हृदयातून दक्षिण छिद्राच्या द्वाराने निघतो म्हणून त्याला दक्षिण दिशेकडे संबंध असणारा जो अन्वाहार्यपचन किंवा दक्षिणाग्नि असे म्हणतात.

(प्राण, अपान) प्राणापान, व्यान हे तीन शरीरस्थ वायू अग्निहोत्रापैकी तीन अग्नी आहेत. अग्निहोत्रातील गार्हपत्य, दक्षिण व आहवनीय हे तीन अग्नी होत.

## मंत्र चौथा

**यदुच्छवास निश्वासावेतावाहुती समं नयतीति समानः ।**
**मनो ह वाव यजमानः ।**
**इष्टफलमेवोदानः सः एनं यजमानमहरहर्ब्रह्म गमयति ।।४।।**

### अन्वयार्थ

**यत् उच्छवासनिश्वासौ, एतौ आहुती** - उच्छ्वास व निःश्वास या दोन आहुतींना; **समनयति** - समान स्थितीला नेतो; **इति सः समानः** - त्याला समानवायू असे म्हणतात; **मनः यजमानः** - मन यजमानस्वरूप आहे; **इष्टफलं एव उदानः** - जे इष्ट फल आपल्यास प्राप्त होईल, ते उदानवायूकृत होय; **अहरहः** - प्रतिदिवशी; **गमयति** - घेऊन जातो.

### भावार्थ

श्वास, उच्छ्वासरूपी आहुती हा समान प्राण असून, मन हेच यजमान होय. त्याला प्राप्त होणारे इष्टफल हा 'उदान' प्राण होय. तोच यजमानाला दररोज झोपेत ब्रह्मस्वरूप प्रतीत होतो. (दररोज ब्रह्माकडे पोचवितो.)

## समान, उदान आणि मन यांचे व्यापार

या मंत्रात समान, उदान आणि मन यांचे अग्निहोत्रस्थ व्यापार सांगितले आहेत. श्रुतीने या प्राणपंचकावर अग्निहोत्राचे रूपक केले आहे. त्यात तीन अग्नींची मागील मंत्रात व्यवस्था लागली. ह्या रूपकात होमाचा कर्ता ऋत्विज कोण? ह्या प्रश्नाला प्रथम येथे उत्तर आहे.



उच्छ्वास व निःश्वास हे अग्निहोत्रातील आहुतीप्रमाणे आहेत. ह्या हवनीय अग्नीमध्ये समान हा सारखेपणाने, या आहुती अखंडपणे देत राहतो. स्वतः समान हाच अग्नी असून, तोच जाणता याज्ञिक असून त्याचे यजमानपद मनाकडे मानले आहे.

प्राण हे अग्नी, श्वासोच्छ्वास या आहुती, समानवायू हा कर्ता व मन यजमान व इष्ट फळ म्हणजे उदान वायू. ते मोक्षाचे साधन आहे. म्हणून उदानवायूलाच इष्ट फल असे म्हटले आहे.

विद्वान पुरुष गाढ निद्रा घेत असता मनाला म्हणजे यजमानाला स्वप्नांच्या वृत्तीतून ओढून काढून सुषुप्तीकाली त्या मनाला ब्रह्मस्थिती प्राप्त करून देतो. यजमानाला जशी स्वर्गप्राप्ती त्याप्रमाणे त्यांनी पुरुषाच्या मनाला ब्रह्मप्राप्ती होते. ही प्राप्ती करून देणाऱ्या उदानाला इष्ट फल असे म्हटले आहे. विद्वान पुरुषाचे मन अहोरात्र ब्रह्मचिंतन करीत असते, म्हणून निद्रेमध्येही त्याचे ब्रह्मज्ञान जागृत असते. गाढ निद्रेमध्ये अज्ञानी, ज्ञानी अशा सर्वांनाच ही ब्रह्मप्राप्ती होत असते. पण ती अज्ञान्याला समजत नाही.

याप्रमाणे पंचप्राणाची व्यवस्था लावली आहे. प्राण, अपान आणि व्यान हे आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नी. समान प्राण हा कर्ता, उदान हा इष्ट फल. श्वास, निःश्वास या आहुती आणि मन हे यजमान. याप्रमाणे प्राण हे वायुशरीररक्षक आहेत. गार्हपत्य अग्नी जसे गृहाचे रक्षण करतो त्याप्रमाणे तीन वायू प्राण शरीराचे रक्षण करतात. उदानवायू सुशुम्ना नाडीच्या द्वाराने ब्रह्मरंध्रात शिरून तेथे मनाला नेतो व ब्रह्मप्राप्ती करून देतो. असा उदानवायूचा महिमा आहे.

## मंत्र पाचवा

**अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति ।**
**यद्दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुश्रुणोति**
**देशदिगन्तरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति**
**दृष्टं चादुष्टं च श्रुतं चाश्रुतं चानु भूतं चाननुभूतं च**
**सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः पश्यति ।।५।।**

### अन्वयार्थ

**यत् दृष्टं दृष्टं अनुपश्यति** - जे वारंवार पाहिले आहे ते (स्वप्नात) पाहतो; **अनुभूतं च अननुभूतं च** - अनुभव आलेले व अनुभव न आलेले; **सच्चासच्च -सत् च असत् च** - सत् वस्तू व असत् वस्तू.

**भावार्थ**

तो हा देव म्हणजे मन स्वप्नात ब्रह्याचा अनुभव घेतो. तो जे पाहतो, अनुभवतो, ऐकतो, ऐकण्याची इच्छा करतो, तसेच प्रवास करतो, त्याचा तो पुनःप्रत्यय घेतो. एवढेच नव्हे तर पाहिलेले, न पाहिलेले, ऐकलेले, न ऐकलेले, अनुभवलेले, न अनुभवलेले, सत् वस्तू व असत् वस्तू असे सर्व प्रकारचे पदार्थ आपण पाहतो व आपणच सर्वरूप होऊन सर्व पाहतो.

## स्वप्नसृष्टीचा द्रष्टा मन आहे

स्वप्नामध्ये सर्व बाह्य नेत्रकर्णादि इंद्रिये आपापली कार्ये सोडून निवृत्त झालेली असतात पण प्राणापानादि वायू जागे राहून रक्षण करीत असतात. गाढ निद्रेच्या आधी स्वप्नस्थिती असते.

अशा स्वप्नावस्थेत मन आपले ऐश्वर्य पाहत असते. एकाच काळी विषय आणि विषयी होणे (पाहण्याचे पदार्थ व पाहणारा होणे), अनेक स्वरूपे घेणे हा मनाचा महिमा मनाला स्वप्नस्थितीमध्ये अनुभविता येतो. आपले मन स्वप्नातील अनंत पदार्थ उत्पन्न करून अथवा ते पदार्थ आपण होऊन, आपले मन स्वतः उत्पन्न केलेल्या किंवा आपण झालेल्या पदार्थांचे साक्षी असते.

अशा मनाला मनपण देणारा क्षेत्रज्ञ हा स्वतंत्र असतो व अलिप्तही. आत्मा जागाही नसतो व तो झोपतही नाही. परंतु मनाच्या संयोगाने मनरूप होऊन स्वप्नादिकांचा भोग घेतो. आत्मा मनरूप होऊन जागृतादि तीनही अवस्थांचे अधिष्ठान असला तरी त्याचे स्वयंप्रकाशत्व अबाधितच राहते.

जागृतकाली वस्तू पाहत असता किंवा आपण कर्म करीत असता मनावर काहीएक विशिष्ट संस्कार होत असतात व स्वप्नकाळी ते ते संस्कार मनःप्रेरणेने व स्वबलानुरूप जागृत होतात आणि जीवाचे बाह्य व्यापार संपले म्हणजे त्यातील बलवान संस्कार आपले स्वरूप प्रकट करतात. या स्वरूपांचा द्रष्टा मन आहे. त्यांचा कर्तासुद्धा मनच आहे.

सामान्यतः स्वप्नामध्ये ज्या वस्तूंचा अनुभव आपल्यास येतो त्या वस्तू जागेपणी आपण पाहिलेल्या किंवा ऐकलेल्या असतात. केव्हा केव्हा आपण प्रत्यक्षात जी वस्तू पाहिली किंवा ऐकली नाही त्या वस्तू स्वप्नामध्ये दिसतात. याचा उलगडा श्रुतीने केला आहे. मागील जन्मातील अनुभवांचे जे जे संस्कार असतात ते ते सर्व, या जन्मीसुद्धा अनुभवास येतात. जागेपणी जे जे पाहावे



किंवा अनुभवावे ते वासनारूपाने मनात शिल्लक राहते व तेच स्वप्नांच्या रूपाने व्यक्त होते. जीवाला अविद्येमुळेच ह्या तीन अवस्थांत राहावे लागते व ती अविद्याच स्वप्नसृष्टी दाखविते. मन हे अविद्यारूप असून स्वप्नही अविद्याच दाखविते. हा सर्व प्रकार मनाच्या वासनासामर्थ्याने सिद्ध होतो. म्हणून मन स्वप्ने पाहते व स्वप्नांचे साक्षी होते. कर्णनेत्रादि इंद्रियास प्रलिन करणारे मन अप्रलिन म्हणजे जागे असले म्हणजे तेथे राहून मनोमय झालेला (मनच असणारा) आत्मा, क्षेत्रज्ञ द्रष्टा मात्र आहे. मन ही उपाधी आहे आणि या उपाधीमुळे जीव भिन्न भिन्न स्थितीत असतो. ज्ञानरूपी जीव नेहमी जागृती सुशुप्त्यादी अवस्थांच्या पलीकडचा आहे. तो जागा आहे किंवा निजला आहे असे आपण म्हणतो ते मनाची उपाधी लक्षात आणून म्हणतो. मन आहे म्हणून त्याला जागेपणाची किंवा सुशुप्तीची अवस्था प्राप्त होतेशी दिसते.

म्हणून मनाला स्वतंत्र असे म्हटले आहे. कारण मन हेच स्वप्नातील चमत्कार पाहते. मन स्वतःच स्वतःचा महिमा स्वतंत्रतेने पाहते. कारण मोक्ष मिळण्यापर्यंतचा स्वयंप्रकाशत्वादि जो व्यवहार आहे तो सर्व व्यवहार मनःप्रभृति उपाधींनी उत्पन्न केलेला आहे म्हणून तो सर्व अविद्येचा विषय आहे. अशा रीतीने मनरूप देवच स्वप्नरूप मनाला पाहत असतो.

### मंत्र सहावा

**स यदा तेजसाऽभिभूतो भवति ।**
**अत्रैष देवः स्वप्नान् न पश्यति ।**
**अथ तदैतस्मिञ्शरीरे एतत्सुखं भवति ॥६॥**

**अन्वयार्थ**

**तेजसा** - तेजाने; **अभिभूतः** - व्यापला (जातो); **स्वप्नान् न पश्यति** - स्वप्ने दिसत नाहीत.

**भावार्थ**

ज्या वेळी हे मन तेजाने व्यापले जाते तेव्हा त्या मनाला स्वप्ने दिसत नाहीत. तेव्हा ह्या शरीरामध्ये तो सुख अनुभवितो.

## सुशुप्तीत मनाला शुद्ध सुख प्राप्त होतें

ज्या वेळी मनावर तेजाचा प्रादुर्भाव होतो त्या वेळी त्याला स्वप्न वगैरे काही दिसत नाही. त्या वेळी ते मन शुद्ध सुखाच्या आनंदात असते.

मनाची अधिष्ठात्री देवता ज्या वेळी सूर्यसंबंधी नाडीत राहणाऱ्या पित्त नामक तेजाने सर्वतः व्यापून जाते, म्हणजे ज्या वेळी मनात असणाऱ्या वासना लीन होतात त्या वेळी निद्रासमयी हृदयामध्ये मन इंद्रियांसह लीन होते. ज्या वेळी इंद्रिये मनासह शांत होतात, तेव्हा त्यांना दुःख व भीती यापासून बाधा होत नाही. त्यामुळे त्यांना पूर्ण विश्रांतीसुख प्राप्त होते.

मनाला हे शुद्ध विज्ञानत्व प्राप्त झाले म्हणजे स्वप्ने पाहता येत नाहीत. शारीरिक दृष्टीने पाहावयाचे म्हणजे आपल्या शरीरातील पित्तद्रव्य मनाला व्यापून टाकते व मनाचे चांचल्य नाहीसे करते. हे द्रव्य सूर्यशक्तीचे द्योतक आहे.

अशा वेळी मनाचा लय ब्रह्मात होतो. त्या काळी वासनांचा उद्भव होत नाही. या वेळी या शरीरात शुद्ध ज्ञानस्वरूप असलेले निर्मळ व निरामय सुख निर्माण होते. ज्याप्रमाणे एखाद्या निर्वात प्रदेशात ठेवलेला दिवा जसा आपल्या पूर्ण वैभवाने प्रकाशित असतो त्याप्रमाणे भ्रमशून्य झालेले स्वरूपसुख व आपल्या संपूर्ण वैभवाने सुशुप्तीकाली प्रकाशत असते.

अज्ञान, वासना व कर्म करण्याची प्रबळ इच्छा ही सर्व उपकरणे शांत झाली असता अशी स्तब्ध, शांत अवस्था मनोदेवाला प्राप्त होते. अशा गाढ निद्रेत निरामय सुख त्याला प्राप्त होते.

### मंत्र सातवा

**स यथा सोम्य वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठन्ते ।**
**एवं ह वै तत्सर्वं पर आत्मनि संप्रतिष्ठते ।।७।।**

### अन्वयार्थ

**सोम्य** - हे सोम्य!; **वयांसि** - पक्षी,; **वासोवृक्षं** - वसतीस योग्य असणाऱ्या वृक्षांचा; **संप्रतिष्ठते** - आश्रय करतात; **आत्मनि** - आत्म्याच्या ठिकाणी.

### भावार्थ

हे सोम्य! ज्याप्रमाणे पक्षी आपल्या घरट्याच्या वृक्षावर आश्रय



घेतात, त्याप्रमाणे हे सर्वजण (इंद्रिय समूह) सर्वश्रेष्ठ असलेल्या आत्म्याच्या ठिकाणी स्थित होतात.

## सर्वजात वस्तू परमात्म्याच्या ठिकाणी स्थित होतात

सर्व पक्षी त्यांना वसतीस योग्य असणाऱ्या वृक्षांचा आश्रय करतात. त्याप्रमाणे यच्चयावत् सर्व वस्तू परमात्म्याच्या ठिकाणी आश्रय घेण्यास जातात.

या सर्व वस्तू कोणत्या ते आठव्या मंत्रात सांगितले आहे. सातव्या मंत्राचाच हा पुढील भाग आहे.

### मंत्र आठवा

**पृथिवी च पृथिवीमात्रा च । आपश्चाऽपोमात्रा च तेजश्च तेजोमात्राच।**
**वायुश्च वायुमात्रा च । आकाशश्चाकाशमात्रा च ।**
**चक्षुश्च द्रष्टव्यं च । श्रोत्रं च श्रोतव्यं च ।**
**घ्राणं च घ्रातव्यं च । रसश्च रसयितव्यं च ।**
**त्वक् च स्पर्शयितव्यं च । वाक् च वक्तव्यं च ।**
**हस्तौ चादातव्यं च । उपस्थश्चानन्दयितव्यं च ।**
**पायुश्च विसर्जयितव्यं च । पादौ च गन्तव्यं च ।**
**मनश्च मन्तव्यं च । बुद्धिश्च बोद्धव्यं च ।**
**अहंकारश्चाहंकर्तव्यं च । चित्तं च चेतयितव्यं च ।**
**तेजश्च विद्योतयितव्यं च । प्राणश्च विधारयितव्यं च ।।८।।**

### अन्वयार्थ

**आपः** - पाणी; **अपोमात्रा** - पाण्याच्या मात्रा; **रसश्च रसयितव्यं** - रसना आणि रस घेण्यास योग्य असे द्रव्य; **त्वक्** - स्पर्शेंद्रिय; **वाक्** - वाणी; **हस्तौ** - दोन हात; **पादौ** - चरण; **गन्तव्यं** - जाण्यास योग्य स्थळ; **बोद्धव्यं** - ज्ञेयपदार्थ; **चेतयितव्यं** - चिंतनीय वस्तू.

### भावार्थ

पृथ्वी व पृथ्वीमाता, जल व रस तन्मात्रा, तेज व रूप तन्मात्रा, वायू आणि स्पर्श तन्मात्रा, आकाश व शब्द तन्मात्रा, नेत्र व रूप, श्रोत्र

व शब्द, घ्राण आणि गंध, रसना व रस, त्वचा व स्पर्शाचे पदार्थ, वाणी व बोलणे, हात व धरण्याजोगी वस्तू, उपस्थ व आनंद, गुद आणि मल, पाय व जाण्याचे ठिकाण, मन आणि मनाचा विषय, बुद्धी व तिचा विषय, अहंकार व अहंकाराचा विषय, चित्त व चेतनीय, तेज व प्रकाशित करण्याच्या वस्तू, त्याचप्रमाणे प्राण व सांभाळावयाच्या वस्तू ह्या सर्व आत्म्यात विलीन होतात.

## सर्व वस्तू आत्म्याच्या ठिकाणी लीन होतात

स्थूल पृथ्वी ही पंचगुणात्मक आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाचही गुण तिच्यामध्ये आहेत पण पृथ्वीची विशेष तन्मात्रा गंध होय. म्हणून पृथ्वी आणि गंध तन्मात्रा, जल आणि रस तन्मात्रा, तेज आणि रूप तन्मात्रा, वायू आणि स्पर्श तन्मात्रा, आकाश आणि शब्द तन्मात्रा होत.

ही सर्व अनुक्रमे स्थूल आणि सूक्ष्म भूते आहेत. याचप्रमाणे नेत्रेंद्रिय आणि द्रष्टव्यरूप, कर्ण आणि श्रोतव्य शब्द, घ्राण आणि घ्रातव्य गंध, रसना आणि आस्वाद घेण्यास योग्य रस, स्पर्शेंद्रिय आणि स्पृश्य वस्तू, वाणी आणि वक्तव्य, हस्त आणि ग्रहणीय पदार्थ, उपस्थ आणि आनंदाचे आगर, गुदद्वार आणि मल, चरण आणि गन्तव्यस्थान याप्रमाणे सर्व ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये व त्यांचे अर्थही सांगितले. संकल्प-विकल्पात्मक मन, निश्चय करणारी बुद्धी, अभिमान हे लक्षण असणारा अहंकार, चित्त व या सर्वांचे निरनिराळे विषय या सर्वांचा येथे समावेश केला आहे. तसेच तेज व प्रकाशित करण्याच्या वस्तू, प्राण व सांभाळावयाच्या वस्तू याबरोबर नामरूप असणारे जे काही आहे ते आत्म्याच्या आधाराने विद्यमान असते.

अशा प्रकारे स्थूल-सूक्ष्म महाभूते, इंद्रिये, त्यांच्या शक्ती व त्यांचे विषय, मन, बुद्धी आदि अंतःकरणचतुष्ट्य व त्यांचे विषय, प्राण व प्राणाचे आश्रित मिळून सर्व वस्तू परमात्म्याच्या आश्रयाने विद्यमान असतात.

### मंत्र नववा

**एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता बोद्धा**
**कर्ता विज्ञानात्मा पुरुषः स परेऽक्षर आत्मनि संप्रतिष्ठते ।।९।।**



### अन्वयार्थ

**एषः हि द्रष्टा** - हाच पाहणारा; **स्प्रष्टा** - स्पर्श करणारा; **घ्राता** - वास घेणारा; **रसयिता** - रस चाखणारा; **मन्ता** - मनन करणारा; **बोद्धा** - जाणणारा; **विज्ञानात्मा** - विज्ञानात्मक पुरुष; **सः परे अक्षरे आत्मनि संप्रतिष्ठते** - हा पुरुष सर्वश्रेष्ठ व अविकारी जो परमात्मा त्याच्या आश्रयाने राहतो.

### भावार्थ

हा पाहणारा, स्पर्श करणारा, श्रवण करणारा, वास घेणारा, रसाचा आस्वाद घेणारा, मनन करणारा, बाह्य विषय जाणणारा, कार्य करणारा, विज्ञानात्मक पुरुष आहे. हा पुरुष सर्वश्रेष्ठ व अविकारी जो परमात्मा, त्याच्यामध्ये व्यवस्थित लीन होतो.

## जीवात्मा हाही परमात्म्यात विलीन होतो

या मंत्रात प्रपंच पाहणाऱ्या जीवाचे वर्णन आहे. प्रापंचिक उपाधी धारण केल्यामुळे तो कर्ता, भोक्ता व विषय पाहणारा असतो.

ज्या साधनाच्या योगाने जाणता येते त्या बुद्धिप्रमुख साधनाला विज्ञान साधन म्हणतात. जे जाणले जाते त्याला विज्ञान असे म्हणतात. विज्ञानाचे स्वरूप कर्तृकारकरूपाने प्रकट होते. कर्तृकारकरूपी जे विज्ञान तोच आत्मा, स्वभाव अथवा धर्म ज्याला विज्ञानात्मा म्हणावे.

कर्ता-भोक्ता जीव हा कार्यकारणाचा संघात असून इंद्रियादि उपाधींनी पूर्ण झालेला आहे. म्हणून त्याला पुरुष अशी संज्ञा आहे.

जसे पाण्यात पडलेले सूर्याचे प्रतिबिंब सूर्याच्या आश्रयाने पाण्यात असते तसे सर्व विश्वास आधार असणाऱ्या अनंत, सर्वश्रेष्ठ, अविकारी, परमात्म्याच्या ठिकाणी जीवाला आधार असतो.

### मंत्र दहावा

**परमेवाक्षरं प्रतिपद्यते स यो ह वै तदच्छायमशरीरमलोहितं**
**शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य । स सर्वज्ञः सर्वो भवति ।**
**तदेष श्लोकः ।।१०।।**

अन्वयार्थ

**यः ह वै तत् अच्छायं** - ज्याला त्या छायाशून्य; **अलोहितं** - वर्णशून्य; **वेदयते** - जाणतो, ज्ञान होते; **सः सर्वज्ञः सर्वं भवति** - तो सर्वज्ञ आणि सर्वव्यापी होतो; **तत् एषः श्लोकः** - याविषयी पुढील मंत्र प्रमाण आहे.

भावार्थ

हे सोम्य! ह्या छायारहित, शरीररहित, रंगहीन, शुभ्र अक्षरपुरुषाला जो जाणतो तो ह्या पर अक्षराला प्राप्त होतो. तो सर्वज्ञ व सर्वरूप होतो यासंबंधी पुढील मंत्र (श्रुतीमध्ये) आहे.

## जो परमतत्त्वाला जाणतो तोच सर्वज्ञ, सर्वरूप

जीव ब्रह्म एकच आहे असे ज्ञान ज्याला होते त्याला त्या ब्रह्माचे पद प्राप्त होते. त्याची लक्षणे या मंत्रात सांगितली आहेत.

जो कोणी निष्काम कर्म करतो अथवा प्रेम लक्षणा, अनन्य भक्तीने त्या परमतत्त्वाशी एकरूप होण्याचा प्रयत्न करतो, तो या अंधकारशून्य किंवा अज्ञानशून्य, नामरूपादि सर्व उपाधींचा व शरीराचा जेथे अभाव आहे, त्या पुरुषोत्तमाला जाणण्याचा प्रयत्न करतो.

मग जो रक्तवर्णादि सर्व गुणविरहित आहे आणि यामुळे जो अत्यंत शुद्ध आहे, जो सर्वथा विशेषणशून्य असल्यामुळे अविनाशी आहे, जो सत्यस्वरूप आहे, ज्याला पुरुषोत्तम म्हणतात, जो प्राणाला व मनाला आहे, त्या शांत, कल्याणकारी, एकरस, जन्मशून्य पुरुषोत्तमाचे ज्ञान करून घेतो तो सर्वत्यागी ज्ञानी पुरुष सर्वज्ञ होतो. असा पुरुष मायेच्या बंधनातून मुक्त होतो. त्याची अविद्या, अज्ञान दूर होते. जीव व ब्रह्म एकच आहे असे ज्ञानविज्ञान त्याला झाल्यामुळे 'मीच सर्व आहे' असा त्याचा निश्चय होतो. असा ब्रह्मपुरुष सर्वज्ञ होतो.

या मंत्रात अच्छाय इत्यादी तीन निषेधात्मक विशेषणे आहेत. ही विशेषणे शरीरत्रयाचा (कारण, सूक्ष्म आणि स्थूल) निरास करून अवस्थात्रयाचा (जागृती, स्वप्न, सुशुप्ती) ही निरास करतात. शुभ्र हे विशेषण चौथ्या अवस्थेचा अवतार करते. शुभ्र व अक्षर ही दोन्ही विशेषणे परब्रह्माची वाचक आहेत.



आत्मा हा तीनही अवस्थांच्या पलीकडे आहे. तो सत्यरूप, एकरस, अज, अप्राण, अमना, शुभ्र आहे. त्याला जाणले की सर्व काही जाणले जाते.

वास्तविक आत्म्यावर अज्ञानाचा आरोप असतो, त्याची निवृत्ती झाली म्हणजे तो स्वस्वरूपात आहे असे ज्ञान होते. ब्रह्माची उत्पत्ती होत नाही. अज्ञान, अविद्येने ब्रह्माच्या स्वरूपावर पडलेले झाकण काढून टाकले म्हणजे ब्रह्मस्वरूप प्रकट होते.

### मंत्र अकरावा

**विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः प्राणा भूतानि संप्रतिष्ठन्ति यत्र ।**
**तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य स सर्वज्ञः सर्वमेवाविवेशेति ।।११।।**

अन्वयार्थ

**सर्वैः देवैः सह** - सर्व देवांसह; **यत्र संप्रतिष्ठन्ति** - जेथे लय पावतात; **वेदयते** - समजते; **अविवेश** - सर्वव्यापी.

## जो परमतत्त्व जाणतो तोच सर्वज्ञ व सर्वव्यापी होतो

अग्निप्रमुख सर्व देवता, नवव्या मंत्रात सांगितलेला विज्ञानात्मा, नेत्रेंदियादि सर्व प्राण, पृथ्वीप्रमुख पंचमहाभूते, ही सर्व ज्या स्वरूपात प्रवेश करून लीन होतात, ते अविकारी व अविनाशी ब्रह्मस्वरूप ज्याला समजते तो हे प्रियदर्शना गार्ग्यशिष्या! सर्वज्ञ होतो. इतकेच नव्हे तर सर्वांमध्ये प्रवेश करून सर्वांस प्रतिष्ठित करतो. तो सर्वव्यापी होतो. 'विचरे विश्व होऊनि विश्वामाजी' अशा आत्मौपम्य भावनेने तो जगात संचारतो. तो ब्रह्म असून ब्रह्म होतो.

**चौथा प्रश्न समाप्त.**



## पाचवा प्रश्न

### मंत्र पहिला

**अथः हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ।**
**यो ह वै तद् भगवन् मनुष्येषु प्रायणान्तमोङ्‌कारभिध्यायीत**
**कतमं वाव स तेन लोकं जयतीति । तस्मै स होवाच ।।१।।**

**अन्वयार्थ**

**शैब्यः सत्यकामः** - शिबिकुलातील सत्यकाम; **पप्रच्छ** - विचारले.

**भावार्थ**

नंतर शिबिपुत्र सत्यकामाने पिप्पलाद ऋषींना विचारले, "हे भगवन्, मनुष्यात जो कोणी मरणापर्यंत सतत ॐकाराचे ध्यान करतो, त्याला कोणता लोक मिळतो?" तेव्हा पिप्पलाद त्याला म्हणाले,

## ॐकार उपासनेचे फळ

या मंत्रात शिबिपुत्र सत्यकामाने पिप्पलाद ऋषींना ॐकाराची उपासना कशी करायची हे जाणण्यासाठी हा प्रश्न विचारला आहे. ज्या लोकांना विवेकयुक्त कठोर वैराग्य प्राप्त झालेले नसते अशा अनधिकारी लोकांचा विचार येथे झाला आहे. म्हणून व्यक्त ब्रह्माचा म्हणजे ॐकार उपासनेचा विचार यात व्यक्त झाला आहे. व्यक्त व साकार जो ॐकार त्याची उपासना विहित मार्गाने केली असता ब्रह्मप्राप्ती साध्य होते. म्हणून या उपासनेचा विधिविचार कसा असतो, हा प्रश्न विचारला आहे.

पर आणि अपर जे ब्रह्म आहे त्याची प्राप्ती करून देण्याला प्रणवाची ही साधना उत्तम आहे. तो प्रणवच ब्रह्मस्वरूप आहे असा साधकाचा ठाम निश्चय असतो. ज्याच्या ध्यानात अखंड ॐकार असतो व ॐकारच आत्मा आहे अशी धारणा करून व अंतःकरणशुद्धी करून जो उपासना करतो त्याला कोणता लोक प्राप्त होतो हे सत्यकामाला जाणून घ्यायचे आहे. असा पुरुष



आपली सर्व इंद्रिये बाह्यविषयापासून परावृत्त करतो व अंतर्मुख होऊन अंतःकरण शांत झाल्यामुळे एका ॐकार स्वरूपाचेच ध्यान करतो. निर्वात प्रदेशामध्ये दीप जसा शांतपणे प्रज्वलित होत असतो त्याप्रमाणे या चिंतनाखेरीज अन्य विषयाला तो मुळीच थारा देत नाही. असा साधक सत्य, अहिंसा, ब्रह्मचर्य पाळणारा वैराग्यशील असतो. अनेक यमनियम अंगी बाणल्यामुळे तो अंतर्बाह्य शुद्ध असतो. अशा प्रकारे ज्याने अधिकार प्राप्त केले त्याला कोणता लोक प्राप्त होतो हे सत्यकामाला जाणून घ्यावयाचे आहे.

### मंत्र दुसरा

**एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोङ्‌कारः ।**
**तस्माद्विद्वानेतेनैवाऽऽयतनेनैक तरमन्वेति ।।२।।**

**अन्वयार्थ**

**सत्यकाम, एतत् वै परं च अपरं, च ब्रह्म यत् ॐकारः** - हे सत्यकाम, जे ॐ आहे ते हे पर आणि अपर ब्रह्म आहे; **तस्मात् एतेन एव आयतनेन विद्वान् एकतरं अन्वेति** - म्हणून ॐकार या आलंबनाच्या साहाय्याने विद्वान पुरुष पर किंवा अपर ब्रह्माची प्राप्ती करून घेतो.

**भावार्थ**

'सत्यकामा, ॐकार हे पर व अपर ब्रह्म आहे. त्यानेच ज्ञाता त्यापैकी एक मिळवतो.'

## ॐकार पर व अपर ब्रह्म असे दोन्हीही आहे

ॐकार हे पर आणि अपर ब्रह्माचे आलंबन आहे. हे ज्याला समजले तो त्या त्या उपासनेने पर किंवा अपर ब्रह्मप्राप्ती करून घेतो, हा या मंत्राचा सारांश आहे.

सत्यकामाच्या प्रश्नाचा अभिप्राय व मनातील हेतू ओळखून पिप्पलाद ऋषींनी ॐकाराचे स्वरूप सांगितले. हे ब्रह्म पर आणि अपर असे दोन्हीही आहे. पर म्हणजे सत्य व अक्षर ब्रह्म होय. जे ब्रह्म शब्दाने व्यक्त होत नाही व जे गुणातीत आहे यालाच पुरुष हे नाव आहे. अपर ब्रह्माचे नाव प्राण हे

आहे. सृष्टीच्या आरंभी अपर ब्रह्माची, सगुण ब्रह्माची उत्पत्ती झाली. या दोन्हींचेही स्वरूप ॐकारात्मक आहे.

परब्रह्म हे निर्गुण स्वरूप असल्यामुळे इंद्रियांना व मनाला हे गोचर नसते. मनाला याचे ज्ञान होणे अशक्य आहे. परंतु भक्तियोगाने व निष्ठेने ब्रह्माची भावना ॐकाराच्या ठिकाणी दृढ झाली असता मन त्या ब्रह्माला ॐकाराच्या रूपाने जाणते.

प्रणवाच्या ठिकाणी जे प्राणांची कल्पना करून त्याची उपासना करतात त्यांना हिरण्यगर्भ लोकाची प्राप्ती होते. म्हणून ॐकाराच्या एकनिष्ठ ध्यानाने परब्रह्म प्राप्ती होते. त्याचप्रमाणे अपर ब्रह्माचीही प्राप्ती होते. ॐकार हे ब्रह्माच्या अत्यंत समीप असणारे आलंबन आहे. ब्रह्मप्राप्तीच्या अन्य साधनाहून हे साधनसामर्थ्य संपन्न आहे, म्हणून विद्वान पुरुष ॐकाररूपी साधनाचा आश्रय करून ब्रह्मप्राप्ती करून घेतात. ॐकार जरी तोच असला तरी साधकाचा भाव जसा असतो तसाच त्याला तो प्राप्त होतो. निर्गुण, निराकार, अक्षर अशा परब्रह्माला साकार करण्याचे सामर्थ्य एका ॐकाराला आहे.

### मंत्र तिसरा

**स यद्येकमात्रमभिध्यायीत । स तेनैव संवेदितस्तूर्णमेव**
**जगत्यामभिसंपद्यते । तमृचो मनुष्यलोकमुपनयन्ते ।**
**स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महिमानमनुभवति ।।३।।**

#### अन्वयार्थ

**ऋचः ते मनुष्यलोकं उपनयंते** - ऋग्वेदांतील मंत्र ह्या ध्यानी पुरुषास - योग्यास - मनुष्यलोकी नेतात; **सः तत्र तपसा, ब्रह्मचर्येण, श्रद्धया, संपन्नः महिमानं अनुभवति** - या लोकी तो योगी तपाने, ब्रह्मचर्याने आणि श्रद्धेने संपन्न होऊन श्रेष्ठ पदाचा अनुभव घेतो.

#### भावार्थ

जर एकमात्रक ॐकाराचे ध्यान करील तर त्याच्या ध्यानाने त्याला येथे मनुष्यजन्म प्राप्त होईल. त्याला ऋग्वेद मनुष्यलोकाला नेतो. तो तेथे तप, ब्रह्मचर्य व श्रद्धा यांच्या योगाने माहात्म्य प्राप्त करतो.



## ॐकारातील 'अ'कार उपासनेचे फळ

अ, उ आणि म् या तीन मात्रांनी ॐकाराचे स्वरूप बनते. अ ऋग्वेदाचा दर्शक आहे, उ यजुर्वेदाचा आणि म सामवेदाचा दर्शक आहे. अ, उ व म अधिक अर्धी असा साडेतीन मात्रांचा हा ॐकाररूप प्रणव आहे.

प्रणवाच्या पूर्ण स्वरूपाचे ज्ञान नसणाऱ्या पुरुषाने जरी यातील एका मात्रेचे ध्यान एकाग्र चित्ताने केले तर त्याला त्या त्या मात्रेचे फळ मिळते. यातील अकाराचे जो ध्यान करतो त्याला अशा खंडात्मक उपासनेमुळे पुढील जन्मात मनुष्य देह मिळतो, कारण अकार हा ऋग्वेदाचा दर्शक असून त्याचे पृथ्वी हे स्थळ आहे, म्हणजे ऋग्वेद हे पृथ्वीरूप आहे. हा अकार ध्याता पृथ्वी लोकांवर एखाद्या ऋषीच्या कुळात जन्माला येतो व तप, श्रद्धा आणि ब्रह्मचर्य याच्या बळावर अविद्यारूप अंधार नाहीसा करून आपले जीवन कृतार्थ करतो.

### मंत्र चौथा

**अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते ।**
**सो ऽ न्तरिक्षं यजुर्भिरुन्नीयते सोमलोकम् ।**
**स सोमलोके विभूतिमनुभूय पुनरावर्तते ।।४।।**

#### अन्वयार्थ

**द्वि मात्रेण मनसि संपद्यते** - दुसऱ्या मात्रेचे (उ काराचे) मनन केले असता; **यजुर्भेहि** - यजुर्वेदाच्या साहाय्याने; **उन्नीयते** - प्राप्त करून घेतो; **अनुभूय** - अनुभव घेऊन; **आवर्तते** - जन्माला येते.

#### भावार्थ

जर तो 'द्विमात्रक' ॐकाराचे ध्यान करील, तर तो यजुर्वेदाने अंतरिक्षलोकाला जातो. त्याला सोमलोक मिळतो. तो सोमलोकात ऐश्वर्य भोगून पुन्हा मनुष्यलोकास येतो.

## उकार चिंतनाचे फळ

प्रणवाच्या द्वितीय मात्रेने म्हणजे उकाराने जो अखंड चिंतन करतो त्याला यजुर्वेदस्वरूप लोक प्राप्त होतो. उकार हा यजुर्वेदाचा दर्शक आहे व यजुर्वेदाची जी सोमदेवता तिचे स्वरूप प्राप्त व्हावे अशी त्यात भावना असते. या चिंतनाने

सोमभावना निश्चित झालेला योगी मृत्यू पावल्यावर अंतरिक्षाचा आधार असणारा जो सोमलोक त्या प्रत तो जातो. तेथील ऐश्वर्याचा पूर्ण उपभोग घेतल्यानंतर हा योगी पुन्हा मृत्युलोकी जन्म घेतो. उकाराच्या उपासनेने त्याला या पितर लोकांची प्राप्ती होते व तेथून पुण्य संपल्यावर पुन्हा मृत्युलोकी यावे लागते.

### मंत्र पाचवा

**यः पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत ।**
**स तेजसि सूर्ये संपन्नः । यथा पादोदरस्त्वचा विनिर्मुच्यते ।**
**एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरून्नीयते ब्रह्मलोकम् ।**
**स एतस्माज्जीवघनात् परात्परं पुरिशयं पुरुषमीक्षते ।**
**तदेतौ श्लोकौ भवतः ।।५।।**

**अन्वयार्थ**

**पादोदरः** - सर्पाला; **पाप्मना** - पापाने; **सामभिहि** - सामवेदाच्या साहाय्याने; **एतस्मात** - त्यानंतर; **जीवघनात्** - जीवघन हिरण्यगर्भापासून; **परात्परं** - अत्यंत दूर असणाऱ्या; **पुरिशयं** - सर्व शरीरात प्रवेश करणाऱ्या; **पुरुषं** - पुरुषोत्तमाला; **तत् येतौ श्लोकौ भवतः** - हाच अर्थ सांगणारे पुढील दोन मंत्र आहेत.

**भावार्थ**

जो कोणी 'त्रिमात्रक' ॐकाराचे ध्यान करतो, तो तेजस्वी सूर्यलोकाला जातो. कात टाकलेला साप जसा नवा होतो, तसा तो (मनुष्य) पापमुक्त होऊन सामवेदाने ब्रह्मलोकाला जातो. त्याला आत्मज्ञान होते.

## संपूर्ण ॐकारोपासनेचे फळ

ज्या साधकाला कठोर वैराग्य प्राप्त झालेले आहे व जो आपल्या देह-भोगाविषयी अत्यंत उदासीन आहे असा पुरुष संपूर्ण ॐकार स्वरूपाची उपासना करतो. साडेतीन मात्रांच्या पूर्ण ॐकारावर जो ध्यान करतो तो सूर्यास्त पुरुषाशीच एकरूप होतो. ज्याप्रमाणे साप वेळ आली असता सहजतेने आपली कात टाकून देतो त्याप्रमाणे त्याच्या पापांचा क्षय होतो.



ॐकाराला परब्रह्माचे ध्यान करण्यास जे आलंबन प्राप्त झाले आहे ते केवळ प्रतीक आहे अशा स्वरूपातच समजायचे. ईश्वराची पूजा करताना विष्णूची, शंकराची अथवा गणपतीची मूर्ती स्थापन करून आपण पूजा करतो हे खरे, पण मूर्ती काही ईश्वर नव्हे. ही ईश्वराचे एक प्रतीक आहे. ईश्वराचे स्मरण करून देण्याचे एक आलंबन आहे. तसाच हा प्रणवाचा विचार आहे. परब्रह्म आणि अपरब्रह्म हे दोन्हीही ॐकार आहेत.

सर्व जीवांचा आत्मा, लिंगदेहाने वेढलेला, जीवाला धारण करणारा व जणू पूर्ण जीवस्वरूप असलेला हिरण्यगर्भच तो होतो. हिरण्यगर्भाचा सत्यनामक जो लोक आहेत तेथे हा योगी जातो. सर्व संसारी जीवांचा आत्मा म्हणजे हिरण्यगर्भ होय. तो लिंगरूपाने सर्व भूतांचा अंतरात्मा आहे. त्याच्यामध्ये सर्व जीव एकवटतात म्हणून श्रुति हिरण्यगर्भाला जीवघन असे नाव देते. जीवाला जसा लिंगदेह असतो तसाच विराट पुरुषाला लिंगदेह असतो. हा समष्टी लिंगदेह आहे. जीवाच्या लिंगदेहाला व्यस्टी लिंगदेह म्हणावे आणि हिरण्यगर्भाला समष्टी लिंगदेह म्हणावे. विद्वान पुरुष ज्याला पूर्ण ॐकारस्वरूपाचे ज्ञान झालेले आहे ह्या जीवघन हिरण्यगर्भाच्याही पलीकडे राहणारा जो परमात्मा नावाचा पुरुष आहे त्याला ब्रह्मलोकातून पाहतो आणि साक्षात्कार झाल्यावर मुक्त होतो. या योग्याला ध्यान करीत असता परमेश्वरी स्वरूपाचा अखंड साक्षात्कार होतो आणि तो मुक्त होतो. असाच अर्थ व्यक्त करणारे पुढील दोन श्लोक आहेत.

### मंत्र सहावा

**तिस्रो मात्रा मृत्यूमत्यः प्रयुक्ता अन्योन्यसक्ता अनविप्रयुक्ताः ।**
**क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्यमासु सम्यक्प्रयुक्तासु न कम्पते ज्ञः ।।६।।**

**अन्वयार्थ**

**तिस्राः मृत्यूमत्यः** - ज्यांच्यावर मृत्यूची सत्ता आहे त्या तीन अकारादि मात्रा; **बाह्याभ्यन्तरमध्यमासु सम्यकप्रयुक्तासु** - बाह्य अभ्यंतर आणि मध्यम ध्यान क्रियेमध्ये; **न कम्पते** - भीतीग्रस्त होत नाही; **ज्ञः** - ज्ञानी पुरुषाला.

### भावार्थ

ॐकाराच्या 'अ'कार, 'उ'कार व 'म'कार या तीन मात्रांना मृत्यू आहे. त्या परस्परसंबद्ध व एकरूप आहेत. बाह्य, अभ्यंतर व मध्य यात चांगल्या प्रकारे त्यांचा उपयोग केल्यास उपासकाचे मन ढळत नाही. 'बाह्य', 'अभ्यंतर' व 'मध्यम' म्हणजे 'जागृत', 'स्वप्न' व 'सुशुप्ति' या तीन अवस्था होत.

## ॐकार साधनेने ज्ञानी पुरुष भयमुक्त होतो

ॐकाराच्या अ'कार, उ'कार आणि म'कार या तीन मात्रा आहेत. या मात्रा मृत्युकक्षेच्या बाहेर नाहीत. या मृत्यूला गोचर आहेत. म्हणजेच त्या मर्त्य आहेत. या मात्रा जर आत्म्याच्या ध्यानप्रक्रियेमध्ये विशेष रीतीने प्रयुक्त केल्या तर ज्ञानी पुरुष भयग्रस्त होत नाही.

अ, उ आणि म या तीन प्रणवाच्या मात्रांचे तीन निरनिराळे विषय आहेत. अ ही मात्रा जागृत स्थितीतील वैश्वानर सदृश्य विश्वनामक पुरुषाची दर्शक असून तिचे स्थान स्थूल शरीर आहे. उ ही मात्रा स्वप्न स्थितीतील हिरण्यगर्भात्मक तेजस पुरुषाची दर्शक असून तिचे स्थान लिंग शरीर आहे. म ही मात्रा सुशुप्ती स्थितीतील ईश्वरात्मक याज्ञपुरुषाची दर्शक असून तिचे स्थान कारण शरीर आहे. या तीन मात्रांचे विषय असे हे निरनिराळे आहेत. या तीन निरनिराळ्या पुरुषांचे एकेकटे ध्यान करणे हे विप्रयुक्त ध्यान झाले. तसे न करता तिन्ही मात्रांचे म्हणजे ॐकारस्वरूपाचे एकत्रित ध्यान करणे म्हणजे अविप्रयुक्त ध्यान होय. एकाच ध्यानकाली बाह्य, अभ्यंतर आणि मध्यम या क्रिया असतात. विशेष भाव सोडून देऊन केवळ सर्व विषय संग्रहात्मक ब्रह्माचे ध्यान करणे हा मात्रांचा अनविप्रयुक्त प्रयोग आहे. या मात्रास एकत्र करून व त्यांचे परस्पर संबंध कायम ठेवून योग्य रीतीने ध्यान केले तर उत्तम प्रकारचे ज्ञान प्राप्त होते.

असे ज्ञान झालेल्या पुरुषास कोणत्याही प्रकारचे भय असण्याचे कारण राहत नाही. जीवाच्या तिन्ही अवस्थांमध्ये साक्षी असणाऱ्या पुरुषोत्तमाचे ध्यान जर सर्व साक्षीत्वाचा उपदेश करणाऱ्या ॐकार स्वरूपाने झाले तर ध्यान करणाऱ्यांच्या सर्व उपाधी नष्ट होतात.

असा ध्यान करणारा मुक्त होतो. थोडक्यात, एकएक मात्रेने ध्यान केले असता मृत्यू येतो आणि ॐकाराच्या सामर्थ्याने ध्यान केले असता जीव मुक्त होतो. हे श्रुतिला सांगावयाचे आहे.



### मंत्र सातवा

**ऋग्भिरेतं यजुर्भिरन्तरिक्षं सामभिर्यत्तत्कवयो वेदयन्ते ।**
**तमोङ्कारेणैवाऽऽयतनेनान्वेति विद्वान्**
**यत्तच्छान्तमजरममृतमभयं परं चेति ।।७।।**

### अन्वयार्थ

**ऋग्भिः** - ऋग्वेदातील; **यजुर्भिः** - यजुर्वेदाच्या यजुनि; **अंतरिक्षं** - चंद्रलोकाचा; **सामभिः** - सामवेदाच्या सामानी; **कवयः** - विद्वान पुरुष; **अन्वेति** - प्रवेश करता येतो; **अजरं** - जरा मरणरहित; **परम** - सर्वश्रेष्ठ.

### भावार्थ

ज्ञाते ऋचांच्या साहाय्याने मनुष्यलोक, यजूंच्या साहाय्याने अंतरिक्षलोक व सामाच्या साहाय्याने ब्रह्मलोक प्राप्त करतात. या तिन्ही लोकी ज्ञाता ॐकाराच्या उपासनेने जातो. शांत, अजर, अमृत, अभय व परब्रह्म हे त्याला ॐकाराच्या साहाय्याने मिळते.

## ॐकार ध्यानाने सर्वश्रेष्ठ गती प्राप्त होते

या मंत्रात पाचव्या प्रश्नाच्या उत्तरांचा सर्व संग्रह एकत्रित झाला आहे. समग्र ॐकाराच्या एकनिष्ठ ध्यानाने प्रथमतः अपरब्रह्माची प्राप्ती होऊन नंतर मग जरा मरणशून्य, निर्भय, शांत आणि सर्वश्रेष्ठ अशा परब्रह्माची प्राप्ती होते.

केवळ 'अ'च्या ध्यानाने मनुष्यलोकाची प्राप्ती होते. 'अ'चे ध्यान म्हणजे ऋग्वेदाचे व तेथे मृत्यूची भीती असते. केवळ 'उ'च्या ध्यानाने (यजुर्वेदाने) सोमलोकाची म्हणजे चंद्रलोकाची प्राप्ती होते पण त्याही लोकात जरामरणाची भीती असते. तिसरा जो ब्रह्मलोक राहिला त्याची प्राप्ती सामवेददर्शक 'म'कार मात्रेने होते. हा त्रिविध लोक ॐकाररूपी प्रतीकाच्या साहाय्याने विद्वान पुरुषाला प्राप्त होतो. हा लोक म्हणजेच अपरब्रह्मलोक होय. येथे सगुण ब्रह्माची वस्ती असते. जो प्रणव अपरब्रह्माच्या प्राप्तीचे साधन होतो, तोच प्रणव परब्रह्मप्राप्तीचेही साधन होतो. हे ब्रह्म अक्षर, सत्य, अज, अमर असे आहे. त्याचे नाव पुरुष

हे आहे. या ठिकाणी भीतीचे कारण राहत नाही ही सर्वश्रेष्ठ स्थिती आहे. आणि अशी शांत, अजरामर, अभय आणि सर्वश्रेष्ठ स्थिती ॐकाराचा एकत्रित आश्रय घेतला म्हणजे प्राप्त होते.

या मंत्रातील इति या शेवटच्या शब्दाने 'दोन मंत्रांचे अवतरण करतो' असे जे पाचव्या मंत्रात सांगितले होते ते अवतरण येथे संपले.

**पाचवा प्रश्न समाप्त.**





## सहावा प्रश्न

### मंत्र पहिला

**अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ ।**
**भगवन् हिरण्यनाभः कौसल्यो राजपुत्रो मामुपेत्यैतं प्रश्नमपृच्छत।**
**षोडशकलं भारद्वाज पुरुषं वेत्थ । तमहं कुमारमब्रुवं नाहमिमं वेद।**
**यद्यहमिममवेदिषं कथं ते नावक्ष्यमिति ।**
**समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति।**
**तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुम् स तूष्णी रथमारूह्य प्रवव्राज ।**
**तं त्वा पृच्छामि क्वासौ पुरुष इति ।।१।।**

**अन्वयार्थ**

**उपेत्य** - येऊन; **व्येत्थ** - जाणतोस काय; **अब्रुवम्** - मी सांगितले; **परिशुष्यति** - नाश पावतो; **अनृतम्** - असत्य; **रथं आरूह्य** - रथावर बसून

**भावार्थ**

सुकेश भारद्वाज याने पिप्पलादाला प्रश्न केला, 'हे भगवन्, हिरण्यनाभ कौसल्य नावाच्या राजपुत्राने मला विचारले, ''भारद्वाजा, षोडशकला पुरुष तू जाणतोस का?'' त्याला मी उतर दिले, ''नाही. जर मला माहीत असते तर मी तुला सांगितले असते. जो खोटे बोलतो. त्याचा सर्वनाश होतो. म्हणून मी खोटे बोलणार नाही.'' तो मुकाट्याने रथात बसून निघून गेला. तो प्रश्न मी तुम्हाला विचारतो, ''तो पुरुष कोठे आहे?''

## सोळा कलांनीयुक्त पुरुषाविषयी प्रश्न

नंतर सुकेशा नामक भारद्वाजपुत्राने प्रश्न विचारला. या मंत्रात सोळा कलांचा पुरुष कोण आहे व त्याचे स्वरूप काय? अशा अर्थाचा हा प्रश्न आहे.

सुकेशाने पूर्वी घडून गेलेली एक घटना पिप्पलाद ऋषींना सांगितली. तो म्हणाला, ''भगवन् हिरण्यनाभ नामक कौशल देशाचा क्षत्रिय वर्णी राजपुत्र माझ्याकडे आला आणि त्याने मला प्रश्न विचारला, 'सोळा कला असलेला पुरुष तू जाणतोस काय? त्याचे स्वरूप जर ठाऊक असेल तर तू मला सांग.' त्यानंतर सुकेश पुन्हा ऋषींना म्हणाला की, प्रश्न विचारणाऱ्या राजपुत्राला मी सांगितले की, मला त्या पुरुषाविषयी काहीही माहिती नाही. तुझ्यासारखा जिज्ञासू समोर आला असता मी त्याला आनंदाने बोध केला असता. मला जर याचे उत्तर माहीत असते व पुरुषोत्तमाचे स्वरूप जर कळले असते तर आपल्यासारख्या योग्यतेच्या प्रश्नकर्त्यास मी नक्की उत्तर दिले असते. भगवन्, मी असे बोललो तरी त्या राजपुत्राच्या मनाचे समाधान झाले नाही. म्हणून मी त्याला पुन्हा समजावले की, ज्याचे ज्ञान असूनही केवळ दुष्ट बुद्धीने ते जर सांगितले नाही तर तो आपला समूळ नाश करून घेतो. असा जो असत्याचा धनी आहे, त्याला इहलोकसुद्धा नाही व परलोकही प्राप्त होत नाही. त्यामुळे तसे मी करणार नाही. असत्य भाषण करणाऱ्या मूर्खाचे शील वेगळे व मी वेगळा असे जाण. असत्य भाषण करणाऱ्यास काय शिक्षा होते ते मला माहीत आहे हे एवढे मी निकराने सांगितले. हे माझे बोलणे ऐकून त्याचा माझ्या शब्दावर विश्वास बसला आणि लज्जित होऊन तो एक अक्षरही न बोलता रथावर बसून निघून गेला. माझ्याकडे येण्यापासून त्याचा काहीएक फायदा झाला नाही.''

सुकेशा शेवटी म्हणाला, ''भगवन्, राजपुत्राने ज्या पुरुषाविषयी मला प्रश्न केला तो पुरुष कोठे राहतो आणि त्याचे स्वरूप काय ते मला सांगा. जोपर्यंत मला ह्या विज्ञेय पुरुषाचे ज्ञान होणार नाही तोपर्यंत ते अज्ञान माझ्या हृदयात शल्याप्रमाणे टोचत राहील. म्हणून मी हे ज्ञान समजून घेण्याविषयी उत्सुक आहे. कृपा करून ही माझी तळमळ आपण दूर करा.''

### मंत्र दुसरा

**तस्मै स होवाच । इहैवान्तः शरीरे सोम्य स पुरुषो**
**यस्मिन्नेताः षोडश कलाः प्रभवन्तीति ।।२।।**

**अन्वयार्थ**

**तस्मै सः होवाच** – म्हणून त्यांनी (पिप्पलाद ऋषींनी) सुकेशाला उत्तर दिले; **अंत शरीरे** – या शरीरामध्येच; **प्रभवन्ती** – उद्भव होतात.



**भावार्थ**

पिप्पलाद सुकेशाला म्हणाले, ''या शरीरातच हे सौम्या (सद्गृहस्था), तो पुरुष आहे. त्याच्यामध्ये षोडशकला आहेत.''

## सोळा कलांचा पुरुष या देहातच असतो

पिप्पलाद ऋषी सुकेशाला म्हणाले की, या षोडशकला पुरुषाचे ज्ञान तुला होईल. याबद्दल तू निराश होऊ नकोस. हा सोळा कलांचा पुरुष आपल्या हृदयकमलामध्येच आहे. येथे जे आकाश आहे त्यातच या पुरुषाचे वास्तव्य आहे. अशा पुरुषाचे स्वरूप न जाणल्यामुळे अज्ञानी लोक त्याच्यावर कलांचा आरोप करीत असतात. एखाद्या वृक्षाचे बुंधा, शाखा, पाने असे भाग असतात त्याप्रमाणे या कलापुरुषाचे सोळा भाग नाहीत. सोळा कलांचे जे हे बोलणे आहे ते केवळ पुरुषाचे स्वरूप समजावून सांगण्यासाठी असून तो जाणल्यावर कलांची कल्पना आपोआप गळून पडते.

इंद्रियांना समजणारे व्यक्त पदार्थ अव्यक्त तत्त्वापासून झाले असून अव्यक्त हे पुरुषांच्या ठिकाणी केवळ अज्ञानामुळे भासते. म्हणून व्यक्ताच्या पाठीमागे अव्यक्ताचा व अव्यक्तामागे असलेल्या तत्त्वाचा मागोवा जेव्हा घेतो तेव्हा सहजच अधिष्ठानरूप पुरुषाचे ज्ञान होते. पुरुषाबरोबर निर्माण होतात, राहतात व लयाला जातात. त्या सोळा कला पुरुषाबरोबर केवळ पुरुषाच्या सत्तेने (माया) भासतात. पुरुष म्हणजे विशिष्ट चैतन्यच कलांच्या रूपाने भासत असते. त्या कला खऱ्या असल्याची कल्पना केवळ अविद्येमुळेच होते.

सर्वव्यापी आत्मा शरीराच्या अंतर्भागीही असतो. अंतःशरीर हे आत्म्याच्या अभिव्यक्तीचे एक निमित्तमात्र आहे. ज्यामध्ये सोळा कला असतात तोच पुरुष शरीराच्या अंतर्यामी आहे असे श्रुती म्हणते. ज्याप्रमाणे सर्व विश्व व्यापणारे आकाश वेळूमध्ये गेले की ते वेळूएवढे झाल्यासारखे वाटते त्याप्रमाणे ज्ञानस्वरूप ब्रह्माने मृत्यूचा आश्रय घेतला की त्या ज्ञानाचा अज्ञानामुळे संकोच होतो. हा पुरुष म्हणजे आत्मस्वरूप आहे. तसा हा पुरुष सोळा कलांनी युक्त आहे असे जरी म्हटले असले तरी ता स्वरूपतः निष्कल आहे, कलाशून्य आहे असे पुढे पाचव्या व सहाव्या मंत्रात श्रुतीच स्वतः सांगणार आहे.

या सोळा कला पुरुषामध्ये उत्पन्न होतात व अस्ताला जातात असे भास मात्राने दिसते, हे श्रुतीस सांगावयाचे आहे. पुरुषाचे स्वरूप निष्कल म्हणजे निर्गुण आहे. या कला सूर्यावर येणाऱ्या ढगांप्रमाणे क्षणभंगुर आहेत. ढग

येतात व जातात पण सूर्य स्वरूपाला त्यापासून यत्किंचितही विकार उत्पन्न होत नाही. कला असल्या म्हणजे आत्मस्वरूप मोठे किंवा लहान होते असाही भाग नाही. ते निर्गुण, निर्विकार, अखंड आणि एकस्वरूप असते, असे विशेषत्वाने येथे सांगावयाचे आहे.

## मंत्र तिसरा

**स ईक्षांचक्रे । कस्मिन्नहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि,**
**कस्मिन्वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामीति ।।३।।**

### अन्वयार्थ

**कस्मिन्न उत्क्रान्ते** - कोणता कर्ता उत्क्रांत झाल्यावर; **कस्मिन्न प्रतिष्ठिते** - कोणाची स्थापना झाल्यावर.

### भावार्थ

त्याने विचार केला, कोण निघून गेला असता मी नष्ट होईन? तसेच कोणामुळे मी स्थिर राहीन?

## परब्रह्माने केलेला विचार

आपली ही सर्व सृष्टी चैतन्याने उत्पन्न केली आहे व त्यासाठीच सर्वव्यापी व निरवयव आत्मा षोडश कलांचा आहे असे श्रुतीने म्हटले आहे. येथे आत्मस्वरूपापासून सृष्टीउद्‌भव कसा झाला याचा विचार केला आहे. कोणत्या गोष्टी प्रकट झाल्या असता आत्मस्वरूप प्रकट होईल व कोणत्या गोष्टी अस्तंगत झाल्या असता आत्मस्वरूप अदृश्य होईल याची मीमांसा आत्म्याने केली आणि त्यानुसार सृष्टीची उत्पत्ती केली.

परब्रह्माने विचार करून विश्वाची उत्तमरीतीने व्यवस्था लावून दिली व आपली क्रीडा करण्याची सोय करून घेतली. या देहाच्या ठिकाणी कोण राहिला असता माझेही अस्तित्व राहील व कोण निघाला असता मीही जाईन असा परब्रह्माने विचार केला, याची मीमांसा या परमतत्त्वाने केली.

या सृष्टीच्या उत्पत्तीने आत्मस्वरूपात काही विकृती झाली असा मात्र भाग नाही. सृष्टी उत्पन्न करणे किंवा ती लयाला नेणे ही कार्ये झाली आहेत असे आपल्याला दिसते. परंतु वस्तुतः परमार्थामध्ये काही उत्पन्न होत नाही



किंवा लयासही जात नाही, अशी स्थिती असते. मृगजल उत्पन्न होणे किंवा ते नाहीसे होणे इत्यादी कार्यांनी सूर्यस्वरूपात जसा कोणत्याही प्रकारचा विकार उत्पन्न होत नाही तसाच विश्वाच्या उत्पत्तीची, स्थितीची व लयाची गोष्ट आहे. जीवदृष्टीने पाहिले असता ही सृष्टी ज्ञानपूर्वक झाली आहे असे दिसते व व्यवहारात ती तशी आहे ही तरीसुद्धा परमार्थ दृष्टीने आत्मस्वरूपाकडे सृष्टी कर्तृत्वाचा किंवा संहारकत्वाचा भाग येत नाही. व्यवहारात परमेश्वर हा सृष्टीचा उत्पादक, संरक्षक आणि विनाशक आहे असेच धरून चालले पाहिजे. हा सृष्टीचा नियंता सर्व मंगल गुणांनी परिपूर्ण आहे म्हणून या सृष्टीनियंत्याची आपण उपासना केली पाहिजे व त्यास प्रिय होईल असेच कर्म केले पाहिजे.

पण उपासनेने व ईश्वरानुकूल कर्माने परिशुद्ध होऊन जेव्हा जीव चिंतन करतो त्या वेळी त्याला परमात्म्याचे व जीवात्म्याचे स्वरूप एकच असून ते निर्विकार, निर्गुण आणि निरामय आहे असेच प्रत्ययाला येते.

व्यावहारिक सृष्टी परमेश्वराने निर्माण केली, कोणी नाही असे या श्रुतीने सिद्ध केले. सृष्टी उत्पन्न झाली म्हणजे परमेश्वरी स्वरूप प्रकट होते, पण ते स्वरूप परमार्थतः अखंड आणि निरंजन आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

## मंत्र चौथा

**स प्राणमसृजत । प्राणाच्छ्रद्धां खं वायुर्ज्योतिरापः पृथिवीन्द्रियं**
**मनोऽन्नमन्नाद्वीर्यं तपो मन्त्राः कर्म लोका लोकेषु नाम च ।।४।।**

### अन्वयार्थ

**असृजत** - त्याने उत्पन्न केला; **प्राणाच्छ्रद्धां** - प्राणापासून श्रद्धा, **खं** - आकाश; **आपः** - पाणी; **लोकाः** - निरनिराळी भुवने.

### भावार्थ

त्याने प्राण निर्माण केला. त्या प्राणापासून श्रद्धा, आकाश, वायू, तेज, जल, पृथ्वी, इंद्रिये, मन, अन्न, अन्नापासून वीर्य, तप, मंत्र, कर्म, लोक व लोकामध्ये नाम उत्पन्न झाले.

## परमात्म्याने संपूर्ण सृष्टी निर्माण केली

परमात्म्याने सर्वांवर सत्ता चालविणारा प्राण उत्पन्न केला. ईश्वराने हिरण्यगर्भ नामक प्राणाला उत्पन्न केले. हा प्राण म्हणजे समष्ठी प्राण असून तोच सर्व प्राण्यांच्या अंतर्बाह्य इंद्रियांचा बुद्धीस्वरूप आधार आहे.

येथे सृष्टीरचनेच्या स्वरूपाचे, क्रमाचे वर्णन आहे. हिरण्यगर्भापासून सर्व प्राण्यांमध्ये विद्यमान असणारी श्रद्धा उत्पन्न झाली. ही जाणीवरूप श्रद्धा पंचमहाभूतांना निर्माण करते. कर्मफलाचा उपभोग घेण्यासाठी जी साधने असावी लागतात त्याचे अधिष्ठान असणारी ही पंचमहाभूते आहेत.

ही पंचमहाभूते म्हणजे आकाश, वायू, तेज, जल आणि पृथ्वी ही होत. शब्द हा आकाशाचा गुण आहे. वायूच्या ठिकाणी शब्द आणि स्पर्श हे दोन गुण आहेत. त्यापैकी स्पर्श हा वायूचा गुण आहे आणि शब्द हा गुण वायूने आपल्या कारणापासून म्हणजे आकाशापासून घेतला. तेजाचा गुण रूप आहे, जलाला रसाचा गुण आहे. पृथ्वीला गंधासह आपल्या कारणांचे चार गुण मिळाले. याप्रमाणे आकाशापासून वायू, वायूपासून तेज, तेजापासून जल व जलापासून पृथ्वी उत्पन्न झाली. त्यामुळे पृथ्वीला पाच गुण आहेत. निरनिराळ्या या पंचमहाभूतांपासून पाच ज्ञानेंद्रीये आणि पाच कर्मेंद्रिये उत्पन्न झाली. या इंद्रियांचा स्वामी जे अंतःकरणात राहणारे मन ते उत्पन्न झाले. मन हे संकल्प विकल्पात्मक असते याप्रमाणे ते प्राण्यांचे कार्य आणि कारण उत्पन्न करते. स्थूल अशा इंद्रियांच्या आधाराने मन द्वेत वाढवीत नेते व त्या इंद्रियांना पोषण्यासाठी मग अन्न निर्माण झाले. अन्नाच्या रसामुळे इंद्रियांना बळ मिळून त्यांच्या साहाय्याने जीवाला कर्म करता येते. या भक्षण केलेल्या अन्नापासून जे बल उत्पन्न होते ते सर्व कर्माच्या प्रवृत्तीचे साधन आहे. या बलाच्या साहाय्याने प्राणी पुण्य-पाप कर्म करतात. या पुण्य-पापांच्या शुद्धीकरणात तप उत्पन्न केले. तपाने शुद्ध झालेल्या अंतर्बाह्य इंद्रियांनी सत्कर्मे करावी यासाठी मंत्र उत्पन्न झाले. यानंतर कर्मफलाचा उपभोग घेण्यासाठी निरनिराळी भुवने उत्पन्न झाली. अशा तऱ्हेने विशिष्ट कर्म विशिष्ट पद्धतीने करीत जाणारा देह एखाद्या नामाचा आधार घेतो.

याप्रमाणे सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम आहे. या सोळा कला प्राण्यांच्या अविद्यादि दोष हेतूंच्या दृष्टीने उत्पन्न झाल्या आहेत. हा सोळा कलांचा सर्व पसारा अभासात्मक आहे. जसे डोळ्यात बोट घातले की एका चंद्राचे दोन चंद्र दिसतात किंवा स्वप्नात आपल्याला अनेक पदार्थ दिसतात, त्याप्रमाणे ही सर्व



सृष्टी मिथ्या आहे. पुरुषाने अविद्याकाली उत्पन्न केलेली ही सर्व सृष्टी अविद्या संपल्याबरोबर ह्या पुरुषामध्येच लीन होते. नामरूपादि विभागही या सृष्टीबरोबरच ब्रह्मामध्ये नाहीसे होतात.

### मंत्र पाचवा

**स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति।**
**भिद्येते तासां नामरूपे । समुद्र इत्येवं प्रोच्यते । एवमेवास्य**
**परिद्रष्टुरिमाः षोडश कलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति।**
**भिद्येते चासां नामरूपे । पुरुष इत्येवं प्रोच्यते ।**
**स एषोऽकलोऽमृतो भवति । तदेष श्लोकः ।।५।।**

**अन्वयार्थ**

**इमाः स्यन्दमानाः** – या वाहणाऱ्या (नद्या); **भिद्येते** – भिन्न होऊन; **पुरुषायणाः** – पुरुषाच्या (कला); **इत्येवं प्रोच्यते** – असे म्हणता येते; **अकलः** – निष्कल

**भावार्थ**

नद्या समुद्राला जाऊन मिळतात व नाहीशा होतात. त्यांचे नाम, रूप नाहीसे होते. त्या 'समुद्र' नावानेच ओळखल्या जातात. त्याप्रमाणे मनुष्याच्या सोळा कला, मनुष्याच्या शरीरात येऊन नष्ट होतात. त्यांचे नाम, रूप नाहीसे होते. फक्त मनुष्य (पुरुष) म्हणून लोक त्यांना पुढे ओळखतात. तो हा 'अकल' (षोडशकलारहित) अमृत होतो, या अर्थी निम्नलिखित श्लोक आहे.

## सोळा कलारूप नद्या परमात्म्यरूपी समुद्राला मिळतात

वरील मंत्रात नद्या व समुद्राचा दृष्टांत आहे. ज्याप्रमाणे या वाहणाऱ्या नद्या समुद्रापर्यंत जातात व त्याच्याशी एकरूप झाल्यानंतर अस्ताला जातात त्या वेळी त्या नद्यांचे स्वतःचे नामरूप नाहीसे होते व त्यास समुद्र हे नाव प्राप्त होते.

त्याचप्रमाणे सर्व दृष्ट्या पुरुषाच्या या सोळा कला पुरुषाकडे जातात व तेथे त्या अस्त पावतात आणि त्यांची नामरूपे पुरुषामध्ये नाहीशी होतात.

जेथे या कला विलयाला जातात तोच पुरुष हे जाणून त्याचा अनुभव घेणारे मुक्त होतात. उपाधीने प्राप्त झालेले नामरूप जाऊन त्यांचे मुख्यस्वरूप त्यांना प्राप्त होते. प्राणादि षोडशकलांचे वर्णन मागच्या मंत्रात झाले आहे. या सर्व कला आपल्या नामरूपाच्या उपाधी सोडून देऊन पुरुषमय होतात, त्यामुळे त्या पुरुषाचे स्वरूप या कलास प्राप्त होते.

जे याचा अनुभव घेतात ते निष्कल होऊन अमर होतात. ते अविद्येचा पाश काढून टाकतात व मरणाला मागे ठेवून अमर होतात. ज्याने आपल्या ज्ञानाने अविद्या निर्मित कलांचा नाश केला तो पुरुष प्राणादि कलापासून उत्पन्न होणाऱ्या मृत्यूला मारून टाकतो. हाच अर्थ सिद्ध करण्यासाठी पुढील मंत्राची योजना आहे.

### मंत्र सहावा

**अरा इव रथनाभौ कला यस्मिन् प्रतिष्ठिताः ।**
**तं वैद्यं पुरुषं वेद यथा मा वो मृत्युः परिव्यथा इति ।।६।।**

#### अन्वयार्थ

**रथनाभौ** - रथाच्या तुंबामध्ये; **अराः** - चक्राच्या अऱ्या; **प्रतिष्ठिताः** - स्थापिलेल्या असतात; **वैद्यं पुरुषं वेद** - जाणण्यास योग्य अशा पुरुषाचे ज्ञान करून घ्यावे.

#### भावार्थ

रथाच्या चाकात अरे असतात, त्याप्रमाणे सोळा कला असलेला पुरुष जो जाणतो, त्याला मृत्यूचे दुःख होत नाही.

## आत्म्याचे ज्ञान झाले म्हणजे मृत्यूचे भय राहत नाही

रथाच्या चक्राला असणाऱ्या अऱ्या रथचक्राच्या नाभीमध्ये प्रवेश करून त्या गड्ड्यामध्ये आश्रयाने राहतात त्याप्रमाणे प्राणादि कला उत्पत्ती, स्थिती व लयकाली ज्या पुरुषाच्या आश्रयाने राहतात तोच पुरुष जाणण्यास सर्वथा योग्य आहे. अशा आत्मस्वरूपाचे पूर्ण ज्ञान करून घेतले तर मृत्यूची भीती नाहीशी होईल. तो विमल पुरुष जाणला असता व तो ह्या देहातच आहे असे समजल्यावर मृत्यूचे भय राहत नाही.



### मंत्र सातवा

**तान्होवाच । एतावदेवाहमेतत्परं ब्रह्म वेद ।**
**नातः परमस्तीति ।।७।।**

#### अन्वयार्थ

**तान्ह वाच** - पिप्पलाद ऋषी शिष्यास म्हणाले; **एतावत एव एतत् परमब्रह्म अहं वेद** - परब्रह्माचे मला इतकेच काय ते ज्ञान आहे.

#### भावार्थ

त्या सर्व शिष्यांना शेवटी पिप्पलाद म्हणाले, "मी इतकेच जाणतो, हे परब्रह्म होय. यापेक्षा अधिक काही ज्ञान आहे, असे मला वाटत नाही."

## उपसंहार

याप्रमाणे त्या सहा शिष्यांस ब्रह्मोपदेश करून पिप्पलाद ऋषी त्यांना म्हणाले, "ते ब्रह्म मी जसे जाणले आहे ते सर्वच सर्व तुला मी समजावून सांगितले. ह्यानंतर जाणावयाचे काही शिल्लक राहत नाही. जाणण्यास योग्य अशा परब्रह्माचे ज्ञान मला इतकेच आहे."

* * * * *

### मंत्र आठवा

**ते तमर्चयन्तस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति । नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ।।८।।**

#### अन्वयार्थ

**अविद्याः परं पारं तारयसीति** - अविद्येच्या पैलतीरास आपण तारून नेले आहे.

#### भावार्थ

त्या सर्वांनी त्यांचा सत्कार केला, पूजा केली व म्हणाले, "तूच आमचा पिता आहेस. कारण अज्ञानातून तू आमचा उद्धार केलास," असे म्हणून ते शिष्य परत गेले. ज्ञानसंप्रदायप्रवर्तक अशा परम ऋषींना नमस्कार!

## आचार्य पूजा

याप्रमाणे उपदेश समाप्त झाल्यानंतर त्या शिष्यांनी कृतार्थ होऊन आपल्या आचार्यांची पूजा केली व ते म्हणाले, 'भगवन्, आपण आम्हास पितृस्थानी आहात, आपण आम्हास ब्रह्मोपदेश करून ब्रह्मरूप केले, विद्या देऊन आमचे अज्ञान दूर केले, आम्हास आता असा जन्म प्राप्त झाला आहे की, जेथे आम्हाला नित्यत्व, अजरामरत्व व अभयत्व भोगावयास सापडेल. आमच्या ठिकाणी असलेली अविद्या व विपरीत ज्ञान आपण दूर केले. त्यामुळे जन्ममृत्यूच्या चक्रात सापडण्याचे कारणच राहिले नाही. आपण आम्हाला हा भवसागर पार पाडण्यासाठी विद्यानौका दिली आहे. आम्ही आपली कितीही सेवा केली तरी हे गुरुऋण फेडता येणार नाही. आपल्यास आम्ही पुन्हा एकवार नमस्कार करतो तसेच ब्रह्मविद्येचा जो संप्रदाय ज्या महर्षींनी प्रकट केला त्यांनाही नमस्कार करतो.'

**सहावा प्रश्न समाप्त.**

✹ ✹ ✹ ✹ ✹ ✹



## संदर्भ ग्रंथ

१) प्रश्नोपनिषत् (श्री. शाङ्करभाष्यसमेता) (चिं. ग. भानु)

२) प्रश्नोपनिषद (डॉ. श्रीकृष्ण देशमुख)

३) उपनिषदांचे मराठी भाषांतर (डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव)



# प्रश्न उपनिषद

## लेखक - परिचय

| | | |
|---|---|---|
| **नांव** | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| **जन्म** | : | १९ जानेवारी १९४१ बेळगांव |
| **शिक्षण** | : | १) एम.ए. (इंग्रजी - संस्कृत)<br>२) एम.ए. (मराठी) |
| **व्यवसाय** | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर, येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |
| **छंद व आवड** | : | ● सतत भ्रमण - ५ वेळा एमेरिका -कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणाचा प्रवास.<br>● वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन.<br>● निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.<br>● योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्यान व प्रात्याक्षिक |
| **समाजिक कार्य** | : | ● श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशी संतसाहित्यावर व भगवद्‌गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.<br>● गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध. अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय.<br>● श्रीमद भगवदगीतेचे एकूण पाच खंड प्रकाशित<br>● ईशावस्योपनिषद, केनोपनिषद व कठोपनिषद् ही तीन उपनिषदे प्रकाशित.<br>● दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी भाग १ व २ प्रकाशित. |
| **संपर्क** | : | हरिप्रसाद, सरदार पार्क, ९०५/1 ओ, प्लॉट नं.३, देवकर पाणंद, कोल्हापूर - ४१६०१२<br>दूरध्वनी-०२३१-५६१२३८१ भ्रमणध्वनी-९८२२५१८२४८ |